# अर्पण-पत्रिका

माझे परम पूज्य जनक

**तीर्थरूप कै. बाळकृष्ण माधवराव**

ऊर्फ

**भाऊसाहेब वैद्य**

यांच्या पवित्र स्मृतीस हें पुष्प

**अर्पण केलें आहे.**

—श्रीधर

# हृद्गाचन !

नव्या लेखकानें जगासमोर येण्यांत, परिस्थितीमुळें कायम अडथळा उभा असतो. किती तरी कोवळ्या आशा, अशा तऱ्हेनें जागचे जागीं करपून जात असतील ! माझी स्वत:ची देखील हीच अवस्था होती. आपल्या परिस्थितीमुळें, आपली एकही कृति जगासमोर येऊं शकणार नाहीं; या कायम भावनेनें, मीं हातांत लेखणी घेण्याचेंच सोडून दिलें होतें. मीं कांहीं तरी लिहावें, अशा इच्छेनें किती तरी मित्रांनीं मला उठावणी देण्याचा प्रयत्न केला; परंतु बिकट परिस्थितीच्या काळोखांत, त्यांच्या इच्छांना मान देण्याइतका कुठलाच उजेड मला दिसेना ! अशा स्थितींत जवळ जवळ एक तप विरून गेलें. उगवलेलें आयुष्य असेंच वाळून गेलें असतें कदाचित्. परंतु त्या योगायोगांतून, लोकसंग्रह छापखान्यानें बाहेर ओढून काढलें आहे आतां ! त्याचें ऋण माझ्यानें फिटेल, अशी आशा करण्यांतसुद्धां कृतघ्नपणा आहे !

या कृतींत कांहीं गुण आहेत कीं नाहींत तें मला सांगतां येणार नाहीं; परंतु दोष मात्र भरपूर आहेत. अर्थात् ते आतां या आवृत्तीपुरते तरी अमर आहेत. पान अठरावरील एक मोठा दोष माझ्या हातून फायनल प्रुफें निघून गेल्यावर माझ्या लक्षांत आला; पण त्याला आतां इलाज नाहीं.

या कृतींत जेवढे दोष आहेत तेवढे लेखकाचे आहेत. ते इतरांना वाटून देण्याचा उदारपणा लेखकाजवळ नाहीं.

आलेलें काम म्हणजे मजुरी मिळवण्यासाठीं उरकण्याची पीडा, ही

वृत्ति लोकसंग्रहांतील कामगारांचे ठिकाणीं नाहीं. ते प्रत्येक कामांत आपले-पणाचा जिव्हाळा ओतीत असतात. म्हणूनच त्यांच्याबद्दल सदैव अभिमान मानायला पाहिजे.

आरंभापासून अखेरपर्यंत मला उत्साह देऊन ही कृति करवून घण्याचे बाबतींत आमचे बंधु चि. विनायकराव व माझी पत्नी सौ. सुशिला यांनीं जी दक्षता आणि कळकळ व्यक्त केली, ती स्मृतीवर चिरंतन कोरलेलीच राहील.

पुणें,
तारीख १।३।'३९

श्रीधर बाळकृष्ण वैद्य,
देशपांडे

# अनुक्रमाणिका

# अशिक्षित हृदय

## आरंभ

## निनांवी पत्र

दिवेलागणीला अवकाश होता दहापांच मिनिटें. दिवसभर अविश्रांत श्रम करणारा पक्षिगण, विश्रांतीपूर्वीचा किलबिलाट करून नुकताच शांत होऊं पाहात होता. रखरखीत उन्हांत होरपळलेल्या सजीवांना आपल्या असंख्य विंझणांनीं निसर्गानें वारा घालायला सुरुवात केली होती; अन् त्यामुळेंच हायसें वाटून, ज्ञाते उद्यांच्या विचाराला जेवणापूर्वीं हलवून जागे करीत होते. याच वेळीं पोलादपूरचे बाबासाहेब सरंजामे, स्वतःच्या बंगलीवजा घरांत, आतांवर त्यांची वाट पाहात टेबलावर पडलेलें पत्र हातांत घेऊन, त्यांतील मजकूर दृष्टीनें वेंचीत होते. त्यांच्या समोरच आनंदीबाई आपल्या पतीच्या मुखावर नजर लावून त्यावर आदळणाऱ्या भावनांच्या लाटा मोजीत बसल्या होत्या. त्या निनांवी पत्रांतून पडणारा अर्थ त्यांच्या भावना हलविणारा होता यांत संशय नाहीं; कारण मधून मधून संकुचित अगर विस्फारित होणारे त्यांचे नेत्र, कपाळावर कमीजास्त प्रमाणांत धांवणाऱ्या आंठ्या आणि पठाराप्रमाणें सपाट अशा नाकपुड्यांची होणारी ती चमत्कारिक मोडतोड! या सगळ्या गोष्टी वरील परिस्थितीच्या निदर्शकच समजण्यासारख्या होत्या. आनंदीबाईनादेखील असेंच वाटलें. त्यांनीं हळुवारपणें प्रश्न केला, " कोणाचं तें पत्र? काय म्हटलं आहे त्यांत? आहे का सांगण्यासारखं?" त्यांच्या आवाजांतून ओतप्रोत अधीरता सांडत होती. बाबासाहेबांनीं तें पत्रच त्यांच्या हातांत दिलें, अन् एक लांबच लांब निःश्वास टाकला! जणुं काय आजवरचें सगळें समाधानच त्यांनीं त्या निःश्वासानें बाहेर ओतून टाकलें. आनंदीबाईनीं तें पत्र पाहून तसेंच हातांत धरून

ठेवलें. त्या आपलें पळूं पाहणारें समाधान मुठींत आवळून ठेवूं पाहात होत्या! आपल्या समाधानाला खात्रीनें कुठें तरी तडा गेला, अशा भावनेनें विचल होऊन त्या पतीच्या मुखाकडे पाहात बसल्या. "हें असें कसें झालें?" असाच प्रश्न त्यांच्या त्या दृष्टींतून निघत होता; आणि हें समजूनच कीं काय कोण जाणे, त्यांनींही त्या मूक प्रश्नाचें उत्तर दिलें. "रुचीरसारख्या शत्रुविहीन मुलाबद्दल निष्कारण कोणी असं लिहील, असं नाहीं वाटत मला."

"पण खरंच का वाटतं आपल्याला पत्रांतलं सगळं लिहिणं?" आनंदीबाईंनीं विचारलें. त्यांच्या विचारण्यांत एक प्रकारची आशा धांवत होती.

"खोटं समजण्याचं तरी काय कारण?" खिन्न हास्य करीत त्यांनीं उत्तर दिलें. "हवेंत उष्णतेची वाढ झाल्याखेरीज आभाळांत मेघ कसे गोळा होतील? अणूरेणूच्या अस्तित्वाचा फार झालं तर डोंगर रचला जाईल; पण तेवढं तरी खरं असतंच तिथं."

"मग पुढं?" आनंदीबाईनीं विचारलें. चुकलेली आशा निराशपणें शोधण्याचा प्रयत्न केला होता त्यांनीं, असें विचारून!

"पुढं काय!" बाबासाहेब म्हणाले, "पत्रांतला मजकूर खरा असला म्हणून बिघडलं कुठं! त्याला जें गोड असेल, तेंच आपणही गोड मानलं पाहिजे. नाहीं का?"

"तें जरी खरं असलं, तरी मी म्हणतें, आपल्या आजवरच्या नांवलौकिकाचा अन् कुलशीलाचा नको का कांहीं विचार करायला?"

"फार जुन्या झाल्यात या गोष्टी आतां!" बाबासाहेब थोडेसें हंसून म्हणाले. "हें पहा," ते पुढें बोलूं लागले. "कर्त्यासवरत्या मुलांच्या भावना दडपून टाकण्याच्या भानगडींत आतां आईबापांनीं पडूं नये. कांहीं वेळ यश येईल कदाचित्; पण तें यश नव्हे. मातींत दडपलेल्या दाण्यांना दुप्पट वेगानं मोड फुटून ते जमिनीबाहेर पडत असतात. भावनांचं असंच असतं. त्या जितक्या खुडाल तितक्या जास्त उफळतील. अमुक एक वाट धोक्याची आहे असं म्हटलं कीं भावना नेमक्या त्याच वाटेनं उधळतात. म्हणून म्हणतों, कांहीं न बोलतां जें होईल तें पाहावं झालं." थकलेल्या आशा

कसल्याही परिस्थितीशीं समरस होऊं शकतात, असाच सूर त्यांच्या या वक्तृत्वांतून गळत होता !

"ऐकलं का ! या असल्या एकेरीनं माझं कांहीं समाधान नाहीं होणार. वाटेंत पडलेला कांटा वाटेवेगळा करणं, हें आमचं बायकांचं राजकारण. त्या भावना अन् फिवना कांहीं कळत नाहीं मला. संसार, प्रपंच म्हणजे काय गोदडी आहे होय, वाटेल त्या जातीचं ठिगळ जोडून शोभरी करायला ? "

" वाटेल त्या जातीचीं ठिगळं जोडून शोभा आणतां तुम्ही गोदडीला; आणि मग संसाराच्या बाबतींतच तुम्हांला काय अवघड वाटतं एवढं ? "

" अवघड म्हणजे ! " मानेला एक सुंदरसा झोंका देत त्या उद्‌गारल्या. "अहो, त्या गोदडीला साजेसाच ठिगळाचादेखील रंग शोधावा लागतो. उगीच अलत्या भलत्या अन् गबाळ गलबत्यांचा काय उपयोग ? "

"आहे खरा विचार करण्यासारखा मुद्दा." बाबासाहेब नाकांत तपकिरीची चिमूट चेंगरीत म्हणाले. इतका वेळ वावरत असलेला त्यांच्या चेहऱ्यावरील गंभीरपणा आतां कुठें हंसायला लागला होता. "हें पहा," ते पुढें म्हणाले, " मी स्वतःच या बाबतींत सगळा शोध करून मगच काय तें ठरवणार आहें. तोंपर्यंत रुचीरलासुद्धां ओळख नाहीं द्यायची. नाहीं तर तो भेटायला येतांच, तुमच्या पुत्रप्रेमाची गंगा शंकराची शेंडी फोडून बाहेर पडायची एकदम ! "

"इतकं नको कांहीं हिणवायला ! बायकांचा उदारपणा पुरुषांच्या कोटाइतका सैल नसतो बरं का ! "

मनसोक्त हास्य उधळून दोघांनींही स्वयंपाक घराकडे गमन केलें.

---

## प्रकरण १ लें

# अनपेक्षित ओळख

पश्चिम दिशेच्या वसनाची अवर्णनीय अशी तेजोमय किनार दिसत होती आतां. बिलालपूरच्या बाजारपेठेंतून परत आलेला रुचीर बंगल्यांत प्रवेश करीत होता; इतक्यांत त्याच्या समोरच्याच बंगल्यांतला बाळू गडी त्याच्या समोर येऊन रामराम करून उभा राहिला.

"कोण पाहिजे तुला ?" रुचीरनें त्याचा रामराम स्वीकारून प्रश्न केला.

"हृया बंगल्याचं मालक नव्हं का आपुन ?"

"हं ! काय काम आहे तुझं ? " तीक्ष्ण दृष्टीनें त्याच्याकडे पाहात रुचीरनें विचारलें.

"हृयो कागूद दिलाय बगा तायसाबांनीं. " त्यानें घडी घातलेली एक बारकीशी चिठ्ठी त्याच्या हातांत देत सांगितलें.

"कोण ताईसाहेब ? कसला कागद ?" त्यानें ती चिठ्ठी हातांत घेत विचारलें.

"अव, त्या हृया समुरल्या बंगल्यांत ऱ्हातात बगा. त्येंचा नोकूरच हाये मी."

"असं होय !" असें हंसत म्हणत त्यानें ती चिठ्ठी उलगडली.

नमस्कार विशेष,

अनोळखी आहें मी या ठिकाणीं. त्यामुळं कसा कोंडमारा होऊन गेला आहे. करमणुकीला कांहीं साधन नाहीं. तरी कृपा करून कांहीं तरी वाचायला मिळेल तर मी ऋणी राहीन आपली. वाचून होतांच परत करीन. अपरिचित धटाईबद्दल क्षमा कराल अशी आशा आहे. कळावें.

स्वरूप

"काय रे, कुठं होत्या इतक्या दिवस तुझ्या ताईसाहेब ?" त्या पत्राची उगीचच चुरगळाचुरगळ करीत त्यानें प्रश्न केला. अशा प्रकारचा पत्र-व्यवहार, ही एक नवीनच वस्तुस्थिति त्याच्या समोर आली होती.

"कुठं म्हंजी! कालिजांत व्हत्या ना कालपंवतर!"

त्याच्या या अनवश्यक गमतीदार उत्तरानें रुचीरला आलेलें हंसें त्यानें बळें अडवलें. स्वतःला कांहीं तरी पुष्कळच समजतें आहे, अशा भावनेनें त्याचीं उत्तरें पडत होतीं.

"अरे वा!" तो पूर्वानुरोधानें म्हणाला, "पण काय रे, आल्या कुठून त्या?"

"लई लांबनं. तकडं घाटमाथ्यावं तें पुनं का उनं हाये ना? तकडून बघा."

"असं होय!" ही गंमत अधिक वाढवण्यांत चव नाहीं असें समजून तो म्हणाला, "बरं तर; थांब हं थोडा वेळ."

अशा तऱ्हेनें त्याला थोडा वेळ थांबायला लावून रुचीर आंत गेला आणि दहा पांच मिनिटांतच चार दोन पुस्तकें, कांहीं मासिकें आणि वर्तमानपत्रें हातांत घेऊन बाहेर आला व तीं त्या गड्याच्या स्वाधीन करून त्याला म्हणाला, "हीं तुझ्या मालकीणबाईला नेऊन दे. आणि हें बघ, सकाळ संध्याकाळ फिरायला म्हणून ही बाग मोकळीच असते. त्यांना इकडं यायला कांहीं हरकत नाहीं. पाहिजे तर लायब्ररींतसुद्धां येऊन बसत जा म्हणावं. मी माळ्याला सांगून ठेवतों आमच्या."

गडी निघून जातांच रुचीर कपडे बदलायला म्हणून आंत गेला. कसले तरी नवीन विचार अस्पष्टपणें त्याच्या मनांत डोकावून जात होते; परंतु त्यांचें स्पष्ट स्वरूप त्याला अजून कळलें नसल्यामुळें तो उगीचच डोकें खाजवीत होता. कसल्या तरी नव्या ओढीनें त्याचें मन काळोखांतून धांवत होतें. स्वरूपच्या ओळखीसाठीं तर मनाची ओढ नसेल! पण तें त्याला तरी कुठें सांगतां येत होतें!

पोलादपूरच्या बाबासाहेब सरंजाम्यांचा रुचीर हा वडील मुलगा. आकर्षक शरीरसौष्ठव, खेळकर वृत्ति आणि व्यसनशून्यता यांमुळें तो सगळ्यांचा आवडता होता. तसें म्हटलें तर तें सगळें घरच लोकांना आपलेंसें वाटे. बाबासाहेब आणि त्यांच्या घरांतील सगळीं लहानथोर माणसें म्हणजे

प्रत्येक दीनदुबळ्या घरांतले परमेश्वरच. त्यांतल्या त्यांत रुचीर म्हणजे जरा जास्तच सगळ्यांच्यापेक्षां.

रुचीरचा धाकटा भाऊ वसंत आणि बहीण विमल हीं अद्याप शिकत असून रुचीरनें मात्र मॅट्रिकपर्यंतच शाळेला सोबत दिली. घरची परिस्थिति सुंदर असूनही, त्याच्या खेळकर मनोवृत्तींनीं कॉलेजांत पाऊल टाकलें नाहीं; शिवाय बाबासाहेबांच्या थकीलपणाचेंही एक कारण होतेंच या गोष्टीला. त्यांनींही त्याच्या शिक्षणाचे बाबतींत फारशी खळखळ न घालतां, सर्व कारभार त्याच्यावर सोंपवून सहजावारी होणाऱ्या जनसेवेंत आपलें आयुष्य ढकललें होतें. विलासपूर, पोलादपूर, बिलालपूर वगैरेंसारख्या छोटेखानी शहरांतून त्यांचीं कांहीं घरेंदारें आणि बंगले होते. पुष्कळसा जमीन-जुमलाही निरनिराळ्या ठिकाणीं असल्यामुळें, रुचीर बहुतेक बाहेरगांवीं फिरतीवरच असे. नुकताच तो कांहीं निमित्तानें बिलालपूरला आला होता; आणि या खेपेला निदान दोन महिने तरी त्याला तिथें राहणें भाग होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच रुचीर स्वतःची बंदूक घेऊन शिकारीसाठीं निघून गेला होता; तो अद्याप परत आला नव्हता. सायंकाळचे पांच वाजून गेले होते, बागेंतला माळी झाडांना पाणी घालीत होता; बाकीचे गडी असेच कुठें तरी निरनिराळ्या कामांतून पेरले होते! फिरण्यासाठीं आलेले लोक फुलांचा मधुर आनंद लुटीत इतस्ततः पसरले होते, आणि समाधान शेज धरून तेवढ्या जागेंत खेळत होते; इतक्यांत, तेथल्या त्या एकंदर सौंदर्यांत अप्रतिम भर घालण्यासाठीं म्हणून एक वीस बावीस वर्षांची तरुणी फांकटांतून आंत शिरली. तिला आंत शिरतांना पाहून माळ्यानें झारी तेथेंच खालीं ठेवली अन् तो लगबगीनें तिच्याजवळ येऊन उभा राहिला.

"आपूनच समूरल्या बंगल्यांत रहातां न्हवं?" त्यानें तिच्याकडे न्याहाळून पाहात विचारलें. "मालक मला बजावून गेलंत तुमच्यापायीं. तुम्हांस व्हवी त लायबरीबी खुलून द्या म्हनालेत."

"मालक बाहेर गेलेत वाटतं कुठं!" तिनें थोड्याशा निराशेनें विचारलें.

"आमचं मालक म्हंजे धूळउधळीचं वारं! कधीं पायानं त कधीं बायसिकलनं! कधीं कधीं मोटारबी धांवतीया! अन् घोडं तर रोजचंच हाये म्हना! त्येंचं काय भलं घेऊन बसलात! भुतं-बी धांवत नसतील त्येंच्यागत!"

"बरेच उधळया पायाचे आहेत म्हणायचे तुझे मालक!" तिनें स्मित करीत विचारलें. "आतां येणार नाहींत वाटतं लवकर इकडं?" या प्रश्नांत तिची अधीर उत्सुकता व्यक्त झाली होती. स्वतःच्या मनाला कारणांचा कांहींच मागमूस नसतांना एकाद्या गोष्टीची ओढ लागत असते. या वस्तुस्थितीच्या मागें मनाचे कसले तरी गूढ हेतू असतात आणि ते पुढें उकलतातही.

"येतील कीं आतां दिव पाजवतांना," माळ्यानें उत्तर दिलें. "घटकंत एका ठाणावं असलेल अक्षी अन् घटकंत बारा मुलूक तुडवून परत येनार बक्षी! असं ध्यान हाये बगा ते!"

अडाणी भाषेंतलें सुंदर विवेचन होतें तें त्याच्या धन्याचें. धन्याच्या कर्तबगारीचें कौतुक आणि अभिमान, अशा संमिश्र भावना या माहितींत एकवटल्या होत्या. त्यामुळें कांहीं तरी विशेष आपल्या दृष्टीआड गेलें आहे असें तिला जाणवूं लागलें! ती विनाकारण हिरमुष्टी होऊन त्याला म्हणाली, "बागेंतच फिरून येतें मी जरा वेळ. मला जरूर लागली तर मी हांक मारीन हं तुला."

"हां हां! बिलाशिक मारा. चाकरींत चूक न्हाई व्हायची."

"आणि हें बघ," जातां जातां फिरून वळत ती म्हणाली, "तुझे धनी जर इतक्यांत आले कीं नाहीं, तर मला सूचना दे हं!"

असें म्हणतच तिनें लताकुंजाची वाट धरली. तिची ती सडसडीत आणि मनोहर अशी हरित वस्त्र ल्यालेली देहलता, तेथील लताकुंजांत शिरतांना एक लता दुसऱ्या लतेंत विलीन होत असल्याचा भास होत होता. खालीं बसण्यापूर्वीं तिनें दहा पांच प्रकारचीं फुलें तोडून पृथ्वीवरल्या अप्रतिम दौलतीची मूठ भरली! "विचारांची फुलमूठ भरतां येईल का अशी?" तिनें स्वतःशींच जरा मोठ्यानें प्रश्न केला. आसपास निर्मानुष झाल्याचें

भानच उरलें नव्हतें तिला त्या नादांत. ती माळ्याच्या भयसूचक निनादानें एकदम दचकून जागी झाली आणि इकडे तिकडे पाहात पळतच फांकटाकडे निघाली.

"विठू, एवढं घोडं जाग्यावर जाऊं दे." रुचीर खालीं उतरत म्हणाला, पण त्यानें ते ऐकलें कीं नाहीं कोण जाणे. तो भयविव्हलतेनें रुचीरच्या पायांतून वाहणारा रक्तप्रवाह पाहात उभा होता.

"अरे, असा पाहात काय बसला आहेस? इतकी कांहीं घाबरण्यासारखी जखम नाहीं. दिला थोडासा प्रसाद शिकारीनं झालं! वेडा कुठला!" रक्ताळलेला पाय साफ करण्याचा प्रयत्न करीत असतां तो म्हणाला, अन् हंसलाही पण! पण अगदींच निर्जीव हास्य होतें तें. जखम बरीच मोठी होती ती; आणि रक्तस्रावही सतत दोन अडीच तासांवर झाल्यामुळें तें आतां त्याच्या सहनशक्तीपलीकडे गेलें होतें. आतां त्याचें सर्व अवसान कडक हिंवाळ्यांत गळून पडणाऱ्या पानांप्रमाणें गळून गेलें होतें. त्यानें एकदम खालीं अंग टाकलें. त्याला सावरून धरतां धरतांच माळ्यानें घाबरून बाकीच्या गड्यांना हांका मारल्या. रुचीर अगदीं निपचित पडला होता.

"काय झालं? काय लागलं यांना!" स्वरूपनें जवळ येऊन घाबऱ्या घाबऱ्या विचारलें.

"शिकार! शिकारीनं मार दिला बगा."

तिनें ताबडतोब जवळ जाऊन जखम पाहिली आणि समोरच्या बंगल्यांतून माझी औषधी बॅग पळत घेऊन ये म्हणून विठूला सांगितलें. त्यानेंही वेळ न दवडतां पळत जाऊन बॅग मागून आणली. तिच्या सांगण्याप्रमाणें माळ्यानें एक दोघांचे मदतीनें त्याला आंत, त्याच्या झोंपण्याच्या खोलींत, नेऊन नीट निजवलें.

"आणि हें बघ, ए माळी, तेवढा स्टोव्ह येईल का तुला पेटवतां?"

"इस्टू व्हय! हो बी! त्येंत काय मोठी इद्या मंतिर हाये!" असें म्हणून त्यानें तो पेटवून तिच्याजवळ आणून ठेवला. तिनें स्वच्छ कापसानें जखम धुऊन मोकळी केली आणि औषध लावून ड्रेसिंग केलें.

"आतां यांना असेच स्वस्थ पडूं द्या. कुणी तरी एक जण जवळ

बसा; आणि हें पहा, हे उठले कीं नाहीं, म्हणजे चांगलं प्याला भरून गरम दूध द्या प्यायला. दुसरं कांहीं खाऊं नका म्हणावं. मी सकाळीं येईन आतां." असें सांगून ती थोड्याशा जड पावलांनींच बॅग घेऊन तेथून निघून गेली.

---

## प्रकरण २ रें

# प्रगति

पहांटे पांच साडेपांचला रुचीर जागा होऊन इकडे तिकडे पाहूं लागला. विठू जवळच पेंगत बसला होता. त्याला हांक न मारतां स्वतःच उठून बसण्याचा प्रयत्न तो करूं लागला; तोंच त्याच्या पायाच्या वेदनांनीं, त्याच्या कालच्या दिवसाचें चित्र त्याच्या पुढें उभें केलें. त्याच्या विवळण्यानें विठू खडबडून जागा झाला.

"रुचीर बाबू," त्यानें उल्हासानें हांक मारली. "जाग आली जनूं!"

"होय. तूं बसूनच आहेस वाटतं इथं?"

"त्यें तर कामच हाये माझं. अक्षी घाबरून गेलों व्हतों बगा मी. त्या समूरल्या बाई व्हत्या म्हून बरं झालं!"

"कशाला आल्या होत्या त्या?"

"आल्या व्हत्या फिराया. तुम्हास्नी चक्कर आली अन् मी आरडलों बगा! तवा धांवतच आल्या त्या हरनीवानी. त्यांनींच तर जखम धुऊन वखाद भरलं. अन् बांधन करून मग गेल्या. मला जवळ बसाया बजावून सांगितलं बगा."

"आणि औषध कुठून आणलं त्यांनीं? त्या काय डॉक्टर आहेत?"

"मला घरीं धाडून वखाद भरलेली पेटी आनली बगा! डाक्तर म्हना काईबी म्हना! पन त्या हायेत!"

" खरंच का ! " त्यानें जरा स्मित करीत विचारलें. " माझ्यासाठीं उगीच त्रास पडला त्यांना. " तो फिरून खिन्न होऊन म्हणाला.

" तरास कसला झाला त्यांत ? " विठूनें विचारलें. " मानसानं मानसासाठीं कायबी केलं, त काय उपकार वङ्गं होतं व्हय ? "

" उपकार नाहीं तर काय ! कोण कुणासाठीं इतकं करतं ? "

" रानचीं जनावरंबी करतात एकामेकाचं. त्येंचेपरीस मानसं काय कमी परतिचीं व्हय ? "

" विठू, काय उत्तर देऊं मी तुला आतां ! " रुचीर सलील हास्य करीत म्हणाला. " अरे, भाऊ भावाचा प्राण घेतो, बाप मुलाचा खून करतो, आई पोटच्या पोराला अफू देते, बहीण भावाचें नातें विसरते, मुलगा बापाचा गळा दाबतो आणि काय वाटेल ते बरे वाईट व्यवहार चालतात ! कदाचित् या गोष्टी जनावरांतही असतील; पण माणसांची कर्तबगारी फार मोठी आहे त्यांच्यापेक्षां ! म्हणून काय माणसं कमी प्रतीचीं म्हणावींत ! "

" अन् मग काय म्हनावं ! मानसाची जात म्हंजी लई हुशार जात म्हून म्हनावं व्हय ? "

" आतां बरोबर बोललास. मला उठून बसायला जरा मदत कर पाहूं; म्हणजे तोंड तरी धुऊन टाकीन. सहा वाजून गेले असतील आतां. "

त्याचें तोंड धुऊन होईतों विठूनें स्टोव्हवर दूध ऊन करून ठेवलें होतें, तें त्यानें गरम गरम घेतलें; त्यामुळें त्याला पुष्कळच बरें वाटलें.

" विठू, त्या डॉक्टरबाई फिरून येणार आहेत का इकडं ? "

" असं म्हनल्यात खऱ्या; पन कुनाला ठावं सुमरन हाये का न्हाई तें ! "

" बरं का विठू, " स्वरूप आंत येत असतां विठूचें बोलणें ऐकून हंसत हंसत बोलली. " भांडीं घांसून स्वच्छ करून ठेवणाऱ्या आम्ही बायका, आमची आठवणदेखील घांसून पुसून स्वच्छ ठेवीत असतों ! समजलं का ! "

याच वेळीं आकाशाची पूर्वकिनार गुलालभरित झालेली रुचीरला खिडकींतून दिसली. तिकडे बोट दाखवून तो स्वरूपला म्हणाला, " पहा डॉक्टर, जगाच्या अंधार कोठडींत अरुणानें प्रवेश करून प्रकाश-किरणांनीं आनंद ओतायला सुरुवात केली आहे. याच शुभ वेळेवर तुमचंही आगमन

झालं आहे या आमच्या कोठडींत! आतां मला लवकरच बरं वाटायला लागून मी सुखसरोवरांत यथेच्छ पोहूं लागणार आहें, असं भविष्य करावयाला कांहीं हरकत नाहीं."

या वेळीं त्याच्या मुखावर तृणांकुरांतून फिरणाऱ्या वाऱ्याच्या मंद झुळकीप्रमाणें स्मिताची झुळूक खेळत होती. तिकडे अतृप्त नजरेनें पाहात तिनें हातांतली बॅग खालीं ठेवली व तींतील औषधें वगैरे बाहेर कातीत ती म्हणाली, "आपण काय कवि आहांत ?"

"नाहीं. या घटकेला सुदैवानं तो रोग कांहीं मला झालेला नाहीं!" त्यानें उत्तर दिलें.

या वेळीं त्यानें फेंकलेलें स्मित इतकें मनोरम होतें कीं, तिला तेथली नजरच काढवेना. 'सुंदर स्मिताचं केवढं अप्रतिम वैभव आहे यांच्याजवळ!' ती स्वतःशीं म्हणाली. तिची आधाशी आशा फिरून फिरून त्याच्याकडे चोरटून पाहात होती.

"तो रोग न होण्यांत कसलं सुदैव ओंवतां तुम्ही ? जरा चमत्कारिकच दिसतं हें म्हणणं" अनुपम हास्य करीत ती म्हणाली.

"कसल्याही ऑपरेशन्सनीं हा रोग बरा होत नाहीं! तेव्हां त्याच्या मेहेरबानींतनं सुटलेला जीव म्हणजे सुदैव नव्हे का!"

क्षणभर त्या ठिकाणीं हास्याच्या तुफान लाटा उसळल्या.

"डॉक्टर, तुम्हांला फारच तसदी पडली काल; तुमच्या सहानुभूतीबद्दल आभार मानले, तर तें नुसतं औपचारिकच होईल. तुमचे उपकार!"

"माफ करा हं म्हटलं!" तिनें त्याला मध्येंच थांबवून म्हटलें. "एवढ्या मोठमोठ्या शब्दांचं ओझं वाहून न्यायला मी कांहीं गाडी घेऊन नाहीं आल्यें! विठू, स्टोव्ह पेटवून पाणी ठेव बरं कालच्यासारखं! आणि हें पहा, एक हॉबी म्हणून मीं हा औषधी प्रपंच थाटला आहे. मी कांहीं डॉक्टर नव्हे. गैरसमज होईल आपला!"

"असं असं! तरी देखील डॉक्टर म्हणायला काय हरकत आहे!"

"इश्श! त्यांत कसली हरकत येते आहे! 'डॉक्टर' ही पदवी

म्हणजे कांहीं बाभळीची कांटी नव्हे! म्हणा बापडे तुम्हांला समाधान वाटत असेल तर!"

कांहींच प्रत्युत्तर न करतां रुचीर हंसऱ्या नजरेनें तिच्या बॅगकडे पाहात होता. बॅगवर लिहिलें होतें, "कुमारी स्वरूपाराणी पेडणेकर, एम्. बी., बी. एस्.!" ताबडतोब स्वरूपला स्वतःचा खोटेपणा समजून आला. ती ओशाळली.

"इश्श! मला कीं नाहीं भानच राहिलं नाहीं अगदीं! आहें मी डॉक्टर! आतां तरी संपेल का हा विषय!"

"डिग्री मिळवतांना जितकी खटपट करावी लागली नसेल, तितकी ती लपवतांना करावी लागली!" रुचीर सहज स्मित छेडीत म्हणाला. "हरकत नाहीं! तुम्हांला अप्रिय वाटणारी गोष्ट फिरून उच्चारणार नाहीं मी." असें म्हणून तो पायाचें बांधण सोडूं लागला. त्याबरोबर ती पुढें होऊन म्हणाली, "नाहीं हं! तें नाहीं जमायचं आपल्याला. कांहीं तरीच करून ठेवाल आणखीन्! आतां कीं नाहीं उघड उघड डॉक्टर आहें मी! मला सहन नाहीं होणार असलं कांहीं!"

"जखम झाली हासुद्धां गुन्हाच केला म्हणायचा मीं!" असें म्हणून तो मोकळेपणानें हंसला. तिनेंही तसेंच हास्य करीत तें ड्रेसिंग सोडून पुन्हां औषधोपचार करून ड्रेसिंग केलें; आणि सर्व वस्तू सावकाशपणें बॅगमध्यें भरून ती जायला निघाली.

"कां? घाई आहे फार?" त्यानें कृतज्ञतेनें पाहात प्रश्न केला.

"ज्याला उद्योग नाहीं त्याला फार घाई! असंच आहे हल्लीं माझं!" तिनें मानेला एक मधुरसा झटका देत उत्तर दिलें.

"मग थांबा ना थोडा वेळ. विठूच्या हातचा चहा चालेल कीं,...!"

"न चालायला काय झालं;" तिनें उत्तर केलें; पण याच वेळीं तिच्या चर्येवर एक खिन्नतेची रेषा उमटून पुसली गेली ताबडतोब. "पण कशाला उगीच तसदी!" ती पुढें म्हणाली.

"आतां कशाला ही तसदीची भाषा!" रुचीर निर्व्याज हास्य उधळीत म्हणाला.

"मला स्वतःला चहा फार सुंदर करतां येतो; पण आतां काय त्याचं!"

" ताई, किती अवकाश आहे अजून ! मी जाऊं का घरीं ?" एका पंधरा सोळा वर्षांच्या अव्यंग मुलीनें दारांतून स्वरूपला विचारलें.

" बरोबरच जाऊं आतां. ये ना आंत. " स्वरूप तिला म्हणाली. " ही माझी धाकटी बहीण प्रगति." तिनें तिची रुचीरला ओळख करून दिली. त्यानें अभिवादन करून तिला बसण्याची विनंति केली.

" विठू, करतोसना चहा लवकर !" त्यानें हुकूम दिला.

" त्याला कशाला त्रास उगीच. मीच पाहातें करून." असें म्हणून ती उठूं लागली; पण प्रगतीनें तिला बसायला लावून स्वतःच स्टोव्ह पेटवला.

" आपल्या सौजन्यानं.....!" तो बोलू लागला.

" काल सगळ्या बागेंत हिंडून आलें आहें मी ! सगळी फुलबाग सौजन्यानं दरवळून गेली होती पहा !" स्टोव्हवरच्या चहाप्रमाणंच त्यांच्या हास्याला ऊत आला.

" तुमच्या दर्शनानं सगळ्या लतादेखील पुष्पभरित झाल्या असतील!" तो म्हणाला.

" असं असं !" स्वरूप उद्गारली, " अशा तऱ्हेनें मला परमेश्वराच्या पदवीला पोंचवून निवळ नैवेद्यावर बसवायचं आहे वाटतं !"

" पहा हं !" प्रगति गोड स्मित करीत म्हणाली. " चहा तयार आहे; पण तो तुला द्यायचा कीं डोळ्यावर बोटं ठेवून म्हणूं, 'नैवेद्यं समर्पयामि ! "

---

## प्रकरण ३ रें

# आणखी थोडें

रुचीरला वाटत होतें तितक्या लवकर त्याची जखम भरून येण्यासारखी नव्हती. खरें सांगावयाचें म्हणजे त्याच्यासारखा बळकट हाडांचा माणूस, म्हणूनच तो त्या प्रसंगांतून निभावून घरापर्यंत कसाबसा आला. पांचसहा दिवस तो चांगलाच पडून होता. नाहीं म्हणायला अलीकडे दोन दिवस त्याला बरें वाटूं लागलें होतें. तथापि, डॉक्टरांच्या परवानगीखेरीज पायाला अधिक हालचाल द्यावी कीं नाहीं याबद्दल तो विचार करीत होता. "आज घेऊं याच परवानगी डॉक्टरची" स्वतःशीं असा निश्चय ठरवीत असतांनाच त्याला झोंप लागली. तो सायंकाळीं पांच वाजेपर्यंत जागाच झाला नाहीं.

सकाळ संध्याकाळ स्वरूप अगर प्रगति कुणी तरी येऊन त्याच्या औषधपाण्याची तजवीज लावीत असत. आतां त्याच्या ओळखीचें रूपांतर नियमाप्रमाणें स्नेहांत झालें होतें. आतांही त्या दोघी त्याच्याकडे आल्या होत्या. रुचीरला झोंप लागलेली पाहून दोघीही समाधानानें हंसल्या.

"अहो रुचीर," प्रगतीनें हांक मारली. आणि त्याबरोबर तो खडबडून जागा झाला.

"आतां पुरे हं म्हटलं! आणखीन् किती दिवस पडून घ्यायचं आहे असं!"

"मीही तेंच विचारणार होतों आज. जरा बागेंतून फिरून आलों तर नाहीं का चालणार? पुष्कळच बरं वाटतं आहे मला आतां!"

"रुचीर, कसं हो लहान पोरासारखं करतां अगदीं!" स्वरूप मधुर स्मित करीत म्हणाली. "बरं वाटतं आहे ना? मग चला तर हळुहळू बागेंत आमच्याबरोबर!"

रुचीर उठून बसला आणि हळुहळू मोरीवर जाऊन त्यानें पाण्यानें

तोंड वगैरे स्वच्छ केलें. केंसावरून उजवा हात फिरवीत मानेला एक झटका देऊन त्यानें पायांत स्लीपर चढवला.

" हं चला आतां ! " तो म्हणाला.

" झोंपेंतून आतांच जागी झाली आहे स्वारी ! " प्रगति रुचीरकडे पाहात वांकड्या मानेनें बहिणीला उद्देशून म्हणाली, " मग चहा वगैरे कांहीं ! "

" दहा पांच मिनिटं थांबत असाल तर करूं या कीं ! पेटवूं का स्टोव्ह ? " रुचीर सरळ दृष्टीनें स्वरूपकडे पाहात म्हणाला.

" आमचे हात बिन बोटांचे आहेत वाटतं ? " प्रगति म्हणाली.

" अहो, पण अशानं आयत्या पिठावर रेघा ओढण्याचं व्यसन जडेल ना ! त्याची काय वाट ! " रुचीरनें विनोद केला.

" अग नसेल एकाद्याला बरं वाटत आपल्यासारख्या परक्या माणसांना त्रास द्यायला ! उगीच कशाला ! "

" माफ करा हं ! " रुचीर अजीजीनें म्हणाला, " भलताच अर्थ होतो आहे हा माझ्या म्हणण्याचा. तुमच्या अशा बोलण्यानं मला फार वेदना होतात ! "

रुचीर बोलतां बोलतां एकदम सद्‌गदित झाला. त्याच्या डोळ्यांच्या कडा ओल्या झाल्याचा भास झाला. त्याचा हळवेपणा पाहून स्वरूपलाही आपण कांहीं तरीच बोललों असें वाटलें. तिची खुललेली कळी एकदम कोमेजली. प्रगतीला मात्र त्या दोघांचीही गंमत वाटली. तिनें तोंडाला पदर लावून मनमुराद हंसून घेतलें.

" इश्श ! हें हो काय रुचीर ! क्विनाईनचे डोस घेतल्यासारखीं दोघांनींही तोंडं काय केलींत अशीं ! चहा पाहिजे कीं कडु लिंबाचा रस आणूं हा अगांतूक गंभीरपणा मोडायला ? " प्रगति म्हणाली.

आतां दोघांनाही आपली अनवधानता समजून आली. अन् दोघेंही पण एकमेकांकडे पाहात ओशाळेपणानें हंसले. झालें ! विस्कटलेलें वातावरण पुन: खेळीमेळीला आलें. प्रगतीनें केलेला चहा घेऊन ते तिघेही बागेंत आले. एका लताकुंजांत कोचावर बसतां बसतां प्रगति म्हणाली, " ही सगळी

बाग फिरून पाहणाऱ्या माणसाला कीं नाहीं सहजच तुमच्या भावनांची परीक्षा होईल! खरं ना रुचीर!" दोघींच्याही मुखावर खोडकर हसें बागडूं लागलें.

"बरं कां प्रगतिताई," रुचीर बोलूं लागला. "दिखाऊ परिस्थितीवर उभारलेली काल्पनिक रचना तितकीशी सत्यसृष्टींत उतरत नाहीं कांहीं!"

"तंतोतंत नाहीं तरी पुष्कळच बरोबर सांगतां येतं," स्वरूप म्हणाली.

"इतर बाबतींत शक्य असेल कधीं कधीं; पण माणसांच्या भावनांचं चित्र मात्र तितकंसं नाहीं साधणार. माणसांच्या भावनाच इतक्या परस्परविरोधी असतात कीं, त्याला स्वतःलाच त्यांचं आकलन होत नाहीं. लांब कशाला, या फुलांविषयींच मनुष्याच्या भावना कशा विरोधी असतात पहा. 'किती सुंदर फूल आहे हें!' असं म्हणणाऱ्याच्या भावना खरोखरच कोमल असतात; त्या वेळीं, आणि त्याच वेळीं त्याचीं नखं खालीं फुलाच्या मानेवर असतात! इकडे खुडण्याची क्रिया चालू असतांनाच अगदीं हळू आणि आडदांडपणा न करतां खुडण्याची प्रवृत्ति मनांत गोळा झालेली असते! याचा अर्थ काय!"

"किती सुंदर विवेचन केलंत तुम्ही माणसांच्या भावनांचं!" स्वरूप सहर्ष म्हणाली.

"विवेचन म्हटलं कीं तें सुंदर असायचंच!" प्रगति म्हणाली. "फरक फक्त एवढाच कीं, त्यांत पटवणाराचं अंतर्याम असायला पाहिजे. होय ना हो रुचीर?"

"आहे खरं थोडंसं तसं."

"कां हो रुचीर, तुम्ही तुमच्या धाकट्या बंधूंना कां नाहीं बोलावीत चार दिवस? तुम्ही इतके आजारी असतांना त्यांना कळवलं नाहींत, म्हणून रागावणार नाहींत का घरचीं माणसं?" स्वरूपनें विचारलें.

"हें ग कसलं तुझं विचारणं?" प्रगति विनोदानें म्हणाली. "घरचीं माणसं रागावतील म्हणून तर कांहींच कळवलं नाहीं यांनीं!"

तिघांनींही हास्य उधळलें आणि याच वेळीं आकाशांत तारांची

उगवण सुरू झाली ! जणूं काय जगांतल्या रमणींच्या हास्यांतूनच आकाशांत तारांच्या टिकल्या फेंकल्या जातात !

" बोलावलंही असतं कुणाला; पण तुम्ही ती आवश्यकताच उत्पन्न होऊं दिली नाहींत. यापेक्षां अधिक पद्धतशीर शुश्रूषा परमेश्वरालासुद्धां शक्य नव्हती. खरंच केवढा शीण दिला मी तुम्हांला ! "

" भारीच बाई चमत्कारिक बोलणं तुमचं ! हातानें गोळा केलेल्या मातीचा कधीं पर्वत होत असतो वाटतं ! "

" बरं का रुचीर, प्रगतीनें गालांतल्या गालांत हंसत सुरुवात केली. " हें आभारप्रदर्शन म्हणजे जडलेल्या जिव्हाळ्याच्या नात्याला उसवणंच समजायचं ! भरपाईची पावती घेतल्यावर नात्याचा नूर बदलणं क्रमप्राप्तच आहे ! "

" कोणत्याही सत्कृत्याची उपकार आणि आभार मानून भरपाई होते असं नाहीं म्हणत मी; पण तसं केल्यावांचून मनाला समाधान वाटत नाहीं, हीही गोष्ट खरी आहे. एवढ्यामुळें घातलेल्या नात्याचा दोरा उसवणं कसं शक्य आहे ? "

" मग काय म्हणतां ! " प्रगति म्हणाली, " हा नसत्या जरूरीचा व्यवहार आहे होय ! "

" पुरे बाई आतां ! " स्वरूप बराच उशीर झाला असें पाहून म्हणाली. " कधींच संपायचं नाहीं हें दळण ! पायलीचं दळण अन् पिठाची चिमूट ! "

" पायली पाठीं चिमूट ! " उठतां उठतां रुचीर म्हणाला. " प्रमाण कांहीं वाईट नाहीं फारसं. चला, खरोखरच उशीर झाला आतां. "

" रुचीर, " प्रगति जातां जातां रुचीरला म्हणाली, " चला ना आतां आमच्याकडंच फराळाला ? "

त्यानें तें आमंत्रण आभारपूर्वक नाकारून, जरा चांगलें चालतां येऊं लागल्यावर येण्याचें आश्वासन दिलें.

---

## प्रकरण ४ थें

# मानस बागेंतील भृंगे

स्वरूप आणि प्रगति या दोघी बहिणींचें वास्तव्य असलेल्या बंगल्याचें नांव ' मानस बाग ' होतें. बंगल्याचें आंतलें स्वरूप म्हणजे खरोखरच बागेप्रमाणें उल्हासवर्धक होतें; पण बाह्यांग पाहणाऱ्या माणसाला मात्र या बंगल्याच्या नांवाचें कोडें उलगडत नसे एकाएकीं. कांहीं नेमकीं फुलेरीं आणि कांहीं मामुली झाडवण; एवढ्यावरच बाहेरली बाजू शोभवून काढली होती.

मूळ हा बंगला एका भाटियाचा. त्यानें तो आपल्या ऐषआरामाचा नजराणा म्हणून सुंद्राबाई पेडणेकर या नांवाच्या एका सुस्वरूप गायिकेला बहाल केला आणि आतां तो तिच्या वारसांना म्हणजे स्वरूप आणि प्रगति यांना मिळाला होता. या दोघीही बहिणी साधारण समजायला लागल्यापासून बेळगांवला आपल्या मावशीकडेच होत्या. तेथें प्राथमिक शिक्षण घेतल्यानंतर त्या एका आप्ताबरोबर पुण्यास आल्या. तेथेंच त्यांचा पुढील अभ्यासक्रम पार पडला. स्वरूपनें फक्त आपल्या अभ्यासक्रमाचें शेवटचें वर्ष मुंबईस काढलें आणि फिरून पुण्यास येऊन तिनें आपला काळ बहिणीच्या संगतीनें घालवायला सुरुवात केली. तिची डिग्री अद्याप अडगळींतच पडून होती ! कारण फक्त शिकावयाचें म्हणूनच शिक्षण घेतलें होतें तिनें.

अतिशय सुस्वरूप, सुच्छील आणि गोड स्वभावाच्या मुली होत्या त्या. त्यांचा आनंद कधीं काळीं जर खिन्न होत असेल, तर तो फक्त एकाच कारणासाठीं आणि तें म्हणजे स्वतःचें गौरवहीन कूळ ! आणि याचमुळें चांगलें समजायला लागल्यावरही त्या कधीं बिलालपूरला गेल्या नाहींत. त्यांच्या या स्वभावापुढें नमलेल्या सुंद्राबाई स्वतःच पुण्याला जाऊन चार दोन दिवस राहात असत. त्यांच्या सुदैवामुळेंच त्या पुण्यास आल्या असतां एकाएकीं आजारी पडून कालवश झाल्या; आणि त्याचमुळें अखेरच्या घटकेला मुली जवळ असल्याचें समाधान त्यांना लाभलें.

सुंद्राबाईंची सर्व इष्टेट स्वसंपादित असून ती सुमारें दीड लाखाच्या घरांत होती. नीतिमत्तेची वेली इतकी फोफावेल कीं नाहीं, याची शंकाच आहे. कदाचित् अपवाद म्हणून वसुंधरेवर सांपडतीलही अशीं उदाहरणें; पण ते अपवादच. पण ही इष्टेट कांहीं अपवादांत मोडत नव्हती. कर्मधर्म-संयोगानें इष्टेटीला ज्या वारस म्हणून आल्या, त्याही सुस्वरूप कुमारिका ! अर्थात् लक्ष्मीची मन मानेल तशी खैरात करणारे समाजकंटक पूर्वींच्या ओळखीनें त्या बंगल्याभंवतीं फिरूं लागले. निसर्ग असल्या सैतानांच्यापेक्षां अधिक कर्तबगार असल्यामुळें, तो उकीरड्यावरसुद्धां नंदनवन उभारूं शकतो, याची जाणीव त्यांना कुठून असणार ! त्यांनीं आपला उपद्व्याप सरळ सुरू केला होता आसपास फिरतांना. याची जाणीव त्या दोघींनाही होती; परंतु त्यांचीं मनें शिक्षणानें सुसंस्कृत झालेलीं असल्यामुळें, त्या असल्या वात्रट-पणाकडे दुर्लक्ष करीत असत. एक दिवस एक ब्राह्मण सावकार अचानकपणें उगवले त्यांच्या दिवाणखान्यात. "या; नमस्कार. कोण हवं आहे ?" प्रगतीनें विचारलें.

"मी या बिलालपूरचा नगरशेट आहें. मला मणिभूषण म्हणतात."

"होय का !" स्वरूपच्या आवाजांत थोडासा तिरस्कार प्रतीत हीत होता. "भाग्यरवीच उगवला म्हणायचा आज गरिबाघरीं !"

"असं कांहीं तरी बोलूं नका. तसं म्हटलं तर मी तुमचाच आहें. सुंद्राबाई माझं फार आदरातिथ्य करीत असत या बंगल्यांत ! पण नकोत त्या शोकमय आठवणी आतां ! आतां सुंद्राच्या सगळ्या भाग्याच्या मालक आहांत तुम्ही ! तेव्हां म्हटलं भेटावं झालं येऊन !"

त्याची ती व्यभिचारादि सततच्या व्यसनांनीं तारवटलेली नजर, रंगलेलें थोबाड आणि ते मूर्खपणाचे चाळे; ही सगळी सामग्री त्याच्या वयाच्या उतरंडींतील प्रत्येक पातकाचा भाग दाखवीत होती. शिसारी आली होती त्या माणसाची त्यांना; पण त्यांची शालीनता त्याचा अपमान करायला धजवत नव्हती.

"काय करायचं ठरवलं आहे पुढं ?" शेटजींच्या आशेनें प्रश्न केला.

"ठरवलं बिरवलं कांहीं नाहीं अजून" स्वरूपनें उत्तर दिलें.

"अन् ठरवायला तरी कोण आहे वडीलधारं घरांत ! अनुभव नसल्यामुळं आमचे विचार म्हणजे निरर्थक अडगळच झाली आहे डोक्यांत."

"आमचं आपलं राहूं देत बाजूला !" प्रगति म्हणाली. "पण हे नगरशेट आलेले आहेत इथं ! तेच सुचवतील एकादा सुंदरसा विचार. अनुभवांचं व्यापक पीक घेतलं आहे त्यांनीं या दीर्घायुष्याच्या शेतांतून. त्यांचे शुभ्र केंसच सांगताहेत हें सगळं !" या वेळीं तिनें केलेला अधरदंश जर नगरशेटनीं पाहिला असता, तर त्यांनीं आपल्या पागलपणाचा संसार जरा व्यवस्थित केला असता; पण त्यांच्या दुर्दैवानें तें जुळलें नाहीं.

"आपला वाडवडिलांपासून चालत आलेला धंदा, तसाच चालू ठेवावा माणसानं !" मणिभूषण म्हणाले, "असं आपलं माझं मत आहे हो !"

स्वरूपच्या प्रशांत मुखावरून एक तिरस्कारदर्शक रेषा, विजेप्रमाणें चमकून गेली. अधणाच्या पाण्याची वाफ हातावर येतांच माणूस ज्याप्रमाणें चमकतें, त्याप्रमाणें चमकून प्रगतीनें बहिणीकडे आणि मणिभूषणकडे पाहिलें आणि मान हलवीत खवळून ती म्हणाली, "अस्सं अस्सं ! तुमच्या रंगेल वृत्तींच्या समाधानासाठीं जगांतले उकिरडे पिढीजात चालत राहावेत, असंच आपलं म्हणणं एकूण !"

"आज राग येतो आहे माझ्या म्हणण्याचा; पण अखेर तेंच पटेल पहा. अनुभव सांगतों मी माझा हा."

"रागबीग कांहीं नाहीं." स्वरूप एका बाजूला पाहात एक निःश्वास टाकीत म्हणाली. "कुणी झालं तरी फायद्याचंच सांगतं !"

"बरोबर !" मान हलवीत मणिभूषण म्हणाले. स्वरूपच्या शब्दांनीं अत्यंत प्रसन्न झाले होते ते. "मीही तेंच म्हणतों." ते पुढें बोलूं लागले. "प्रगतिबाईंनीं उकिरड्याची उपमा लावून घेतली पाठीमागं; पण मी म्हणतों, त्यांत काय बिघडलं ! जो उकिरडा शेंकडों रुपये शेराच्या भावानं विकला जातो, तो काय टाकाऊ म्हणायचा ?"

"राग मानूं नका माझ्या बोलण्याचा आतां !" प्रगति संतापातिरेकानें बोलूं लागली. "उकिरडा होण्यांत जर भाव आहे म्हणतां इतका तर तुमच्या घरांत कां नाहीं हा फायदेशीर धंदा सुरू करीत !"

"इतका ताठा बरा नव्हे !" मणिभूषणांचा स्वभाव जागा झाला "एका बाजार–"

"चूप बसा !" अतिशय थंड स्वभावाची स्वरूप संतापून उद्‌गारली. "आमच्या शीलाचा पाणउतारा करूं पाहाल, तर किंमत उतरेल आतां. हा पहा रस्ता. उठा पाहूं आतां !" जिन्याकडे बोट दाखवीत ती संतापानें थरथर कांपत म्हणाली. मणिभूषण कांहीं तरी तोंडांतल्या तोंडांत पुटपुटत चालता झाला आणि खालीं राहिलेल्या प्रक्षुब्ध वातावरणांत या दोघी बहिणी वेड्यासारख्या एकमेकींच्या तोंडाकडे पाहात बसल्या. किती वेळ तरी त्या तशाच स्थितींत बसून राहिल्या होत्या. त्या विषादपूर्ण शांततेचा भंग करून प्रगति म्हणाली, "ताई शीलाचा मक्ता दिला जातो हं जगांत !"

"अग वेडे, हें असंच चालायचं !" स्वरूप तिची समजूत घालीत होती; पण तिच्या स्वतःच्या समजुतीचा मात्र कोंडमारा झाला होता. तिचे तांबडे लाल डोळे आणि तटाटलेल्या कानशिलाजवळच्या शिरा, यांवरूनच तिच्या सात्त्विक संतापाची परमावधि झाल्याचें दिसून येत होतें. तथापि तिचें आत्मसंयमनही फार मोठें होतें. परिस्थितीचें परिशीलन होतांच तिनें सौम्यपणानें प्रगतीला समजावण्याचा प्रयत्न केला "जगांतल्या वेगवेगळ्या प्रकृती वेगवेगळ्या वाटांनीं चालत असतात; म्हणून आपण का आडवाटेनं जायचं आहे ? त्यांत आपलाच घात होईल. शांत हो पाहूं ! असा भावनांचा प्रक्षोभ होणं चांगलं नाहीं. स्त्रियांच्या भावना म्हणजे जाईचीं फुलं! समाजांत मणिभूषणासारखे पुष्कळच फडेनिवडुंग आहेत; त्यांवर तीं फुलं वाळत टाकण्यानं कोणता फायदा होईल ?"

परिस्थितीच्या दुबळेपणाची जाणीव झाल्यामुळें प्रगतीच्या नेत्रांतून अश्रुप्रवाह सुरू झाला. स्वरूपनें तिला जवळ घेऊन समजावण्याचा प्रयत्न करीत असतांना पदरानें स्वतःचे डोळे टिपले !

त्याची शाश्वति नाहीं. कदाचित् प्रचारकार्याच्या दौऱ्यावर असतांनाही अटक होईल मला. तसं झालं तर आपल्या फिरून गांठीभेटी लवकर होणार नाहींत. तुरुंगाच्या दारांत उभें राहून बाहेरच्या आशांचा निरोप घेणं, हें कमकुवत मनाचं लक्षण समजलं जात असेल कदाचित्; पण त्याला नाइलाज आहे. सुटल्याबरोबर कुठल्या आशेकडे धांवत जाऊन आपल्याला समाधान घेतां येईल, कुठल्या हृदयाचे धागेदोरे आपल्याबद्दलच्या काळजीनं पिंजून निघत असतील, कुठले डोळे आपल्या भेटीसाठीं आतुर असतील आणि कुणासाठीं हें धडधाकट आयुष्य घेऊन बाहेर यायचं ! सक्तमजुरीच्या यातनांपेक्षां याच विचारांच्या यातना फार जाणवतात आंत ! देशासाठीं देहाचं दान करतांनाही असल्याच विचारांची खिन्नता माणसाला रंजीस करीत असते ! आयुष्याला कांहीं तरी माधुरी पाहिजे......म्हणजे त्या समाधानाच्या तंतूंवर नाचणाऱ्या जिवाला ......कसल्याही संकटांत यातना होत नाहींत. मी त्या माधुरीचा याचक म्हणून आज इथें आलों आहें. "

तरीही स्वरूपची मूकवृत्ति कायमच होती. त्याचें अधीर मन तिच्या शब्दासाठीं तृषार्त झालें होतें. अबोल परिस्थितीला कंटाळून तो उतावळेपणानें परत बोलूं लागला, "माझ्या सगळ्या आशा तुझ्या ठिकाणीं एकत्र झाल्या आहेत. कसल्याही संकटानं माझ्या मनावर परिणाम होत नाहीं, पण तो आतां तुझ्या उत्तरानं होणार आहे. माझ्या या अनपेक्षित प्रश्नानं जर तुझ्या भावना दुखावल्या जात नसतील, तरच मला उत्तर पाहिजे आहे. सांग, आयुष्याचा सहकारी, सेवक, भक्त किंवा जोडीदार म्हणून माझा स्वीकार करशील का ? आपल्या शिक्षणाकडे पाहिलं, तर माझ्या अशिक्षित हृदयाची पायरी फार खालची आहे; परंतु अशिक्षित हृदयाचा सेवक भक्तीच्या जोरावर पायापर्यंत येऊं शकतो ! "

आतां मात्र तिला हृदय बांधून मारतां येईना. तिच्या भावना उचंबळून आल्या. ती त्याला थांबवून कांतर आवाजांत म्हणाली, " हं ! असलं भलतंच कांहीं तरी नका बोलूं ! मी बोलूं देणार नाहीं असं वेडंवाकडं ! सांगा, मीं कोणतं उत्तर दिल्यानं समाधान होईल आपलं ! "

" ज्या उत्तरानं तुझं स्वतःचं समाधान होईल, त्याच उत्तरानं माझं

" पाहिजे आहे कशाला हा नसता विषय आतां ! " स्वरूप म्हणाली. " तुम्ही असं सांगत सुटलांत तर बिचाऱ्या पाहुण्यांची कुठंच डाळ नाहीं शिजणार या दुनियेंत ! " तिचे डोळे फुलाप्रमाणें हंसत होते हें बोलतांना.

" म्हणजे आजच्या पाहुण्यांचीसुद्धां का ? " प्रगतीनें सस्मित विचारलें.

" माझ्याबद्दल कधींच असं घडणार नाहीं ! " रुचीर म्हणाला. " पण एक मोठी भीति वाटते मला ! असल्या गोड स्वागताचं वेडच लागून राहायचं नेहमीं ! "

" इश्श ! " स्वरूप उद्गारली " तुमचं आपलं कांहीं तरीच ! "

प्रगति आणि रुचीर यांच्या उफळलेल्या हास्यानें स्वरूप अतिशयच लाजली. तिचें सगळें मुखकमल अभिनव अशा रक्तवर्णानें इतकें आकर्षक दिसूं लागलें कीं, रुचीरला आपली दृष्टि तिथें रोखण्याचा मोह अनावर झाला अन् त्यामुळें तिची मोहक अशी तिरपिट उडून ती स्वतःच चहा आणायचं निमित्त करून पळाली. मधल्या वेळांत रुचीरनें आपली नजर तेथल्या प्रत्येक वस्तूवरून फिरवून आणली.

" आज अनपेक्षितच उगवलांत म्हणायचे ! " प्रगति म्हणाली.

" तुमच्या दृष्टीनं अनपेक्षित असेल; पण मी मात्र अपेक्षेप्रमाणंच आलों ! नाहीं वाटत तुम्हाला असं ! "

" काय मौजेचा युक्तिवाद काढलात हो ! आकाशांत एकाकी उगवणाऱ्या धुमकेतूप्रमाणं तुमच्या डोक्यांत कल्पना पटापट उगवतात म्हणायच्या ! "

" श्रीमंताच्या लग्नांतल्या कोठीप्रमाणं माझ्या डोक्याची कोठी बनली आहे ! कसल्या तरी कल्पनांनीं सदा गच्च भरलेली असते ! "

" कसल्या तरी म्हणजे ? "

" अहो, कचऱ्याच्या अड्ड्यावर काय एकाच जातीचा कचरा येऊन राहील ! "

" तुम्हाला सांगायचं आहे तरी काय ! या कचऱ्याच्या डेपोवर आल्यानंतर माझी अगदीं गडबड उडून गेली आहे ! मला तरी बाई उलगडाच होत नाहीं कशाचा ! "

" चहा पाहिजे आहे म्हणून आल्याबरोबर सांगितलं आहे मीं ! "

स्वरूप चहा, चिवडा वगैरे फराळाचें साहित्य घेऊन येत होती. ती रुचीरचें म्हणणें ऐकून म्हणाली, " भारीच बाई आधाशी आहांत तुम्ही ! जरा जरादेखील धीर निघत नाहीं ! "

रुचीरनें मधुर स्मित करीत खुर्ची पुढें ओढून घेतली. आणि सगळ्यांनीं मिळून सुरुवात केली. अर्थात् पहिला चहा फुकट गेला. रुचीरचा प्रत्येक वस्तु घेतांना होणारा सहजसुंदर अभिनय आणि उत्कृष्ट विनोद, यांनीं त्या दोघीही तन्मय होऊन गेल्या होत्या. एकाद्या सुंदरशा बगिचांत गेल्यानंतर ज्याप्रमाणें तिथें समाधानच समाधान वावरत असल्याचा भास होतो, त्याप्रमाणेंच या त्रिकुटाच्या मध्यावर असलेल्या मेजावरून समाधान उसळत असल्याचा भास होत होता. एकाकी प्रगतीला आठवण होऊन तिनें विचारलें, " काय हो रुचीर, उद्यां म्हणे व्याख्यान आहे तुमचं ? "

" दुर्दैवानं आहे खरं ! " जबाबदारीचा पोरकट गंभीरपणा आणीत तो म्हणाला, " माझ्यासारख्या अशिक्षिताला नसत्या पंचायतींत घातलं आहे या लोकांनीं ! "

" तुम्ही अशिक्षित ! " स्वरूप खवचटपणानें म्हणाली, " आणि तुमचं हृदयही अशिक्षित ! आहे खरं ! "

" बरं राहिलं ! अतिशय विद्वान् वक्ते आहोंत आम्ही ! झालं आतां समाधान ! "

त्याचा तो उनाड गंभीरपणा पाहून त्या दोघींची अगदीं मुरकुंडी वळली. त्यांना तशा हंसतांना पाहून तो पुढें म्हणाला, " तुम्हांला काय होतं आहे हंसायला ! ज्याच्या यातना त्याला माहीत. "

" इश्श ! त्यांत कसल्या यातना. नाहीं म्हणून सांगितलं असतंत, तर काय सक्तीची गोणी चढवली असती डोक्यावर कुणीं ! पोतेऱ्याच्या बोळ्यासारखा उगीच आव आणला आहे आतां ! " मान वेळावीत स्वरूप म्हणाली.

" सक्तीच नाहीं तर काय ! ठरवून जाहीर केल्यानंतर सांगितलं मला, कीं तुमचं व्याख्यान जाहीर केलं आहे; आणि विषय काय तर म्हणे संस्थानांतील आगामी लढ्यांत तरुणांची जागा ! "

"अगबाई ! मग उद्यां मेजवानीच आहे म्हणायची तरुणांना ! पूर्वीच्या अनुभवानंच ही घोरपड गळयांत पडलेली दिसते आहे तुमच्या !" प्रगति म्हणाली.

"पूर्वीचा अनुभव म्हणाल तर व्याख्यान ऐकण्याचा आहे. देण्याचा मुळींच नाहीं. असो ! त्याचं काय आतां ! साथींत सांपडलों आहें खरा." रुचीरनें उत्तर दिलें.

"कमाल केलीत हो आतां अगदी ! विश्वास असल्यावाचून का कुणीं ही माळ गळयांत अडकवली आहे तुमच्या ?" स्वरूप वेणीचा शेपटा खांद्यावरून पुढें घेऊन त्याच्या टोंकाशीं खेळत म्हणाली.

"हात जोडले त्या विश्वासाला !" त्यानें दोन्ही हात जोडून अप्रत्यक्षाला नमस्कारीत म्हटलें, "विश्वासानं माळा घालणाऱ्या पोरींना, बोहल्यावरून खालीं उतरतांच टाकून देऊन पोबारा करणारे काय थोडे सांपडतात !"

"ओहो ! काय पण अगदी !" प्रगति भुंवया चढवीत मान तिरपी टाकून बोलू लागली, "माझी खात्री आहे. तुमचं उद्यांचं व्याख्यान फार सुंदर होणार आहे ! गुलाबाच्या झाडावर गुलाबच फुलेल. सद्-गुणांची उधळ तुम्ही वाटेल तेव्हां, वाटेल तिथं, वांकडयातिकडया हातानें करून पाहा; ते आपल्या स्वाभाविक सौंदर्यानंच रुजलेले पाहायला मिळतील !"

"सगळया सद्गुणांचा हिमालय असा एकाच जागेवर नका रचूं ! स्वतःच्या गौरवानं ओशाळलेला रुचीर म्हणाला, "निरनिराळया प्रकारच्या सुगंधी सौंदर्यानं, फुलांच्या जगाची खुलावट करून, विधात्यानं गुणांची अनेकविधता डोळयांसमोर आरशाप्रमाणं धरून ठेवली आहे, तिकडं पहा; त्याचा अर्थच असा आहे कीं, सगळे गुण एका ठिकाणीं समावूं शकत नाहींत. माझ्या एकटयाच्या ठिकाणीं, इतक्या सगळयांचा समावेश होणार कुठून ! आपलेपणानं पाहण्यांत हीच तर चूक होते नेहमीं. दृष्टिपलीकडील टोंका-पर्यंत इतस्ततः पसरलेल्या जगांत, अनेक रंगांनीं दरवळत असलेले गुणावगुण एका ठिकाणीं येणं कसं शक्य आहे ? निसर्गतःच त्यांची वांटणी झालेली

असल्यामुळं आपल्याला चांगल्यावाइटांची दाखवण करतां येते ! कोणत्याही एका गुणाचं पूर्णत्व कदाचित् एका ठिकाणीं होऊं शकेल; परंतु सगळ्यांचं नाहीं होणार. एवढं मात्र खरं आहे कीं, मनुष्यप्राण्याला, पुष्कळशा चांगल्या अगर वाइटांचा सांठा आपल्या ठायीं उत्पन्न करतां येतो ! परंतु त्याला सर्व कांहीं होतां येणार नाहीं."

रुचीर थांबला असें पाहून स्वरूप त्याला म्हणाली, "उगीच थांबवलीत तुमची वाग्गंगा ! गोकाकच्या धबधब्याजवळ बसून त्या जलपतनाकडं पाहात बसलं कीं नाहीं, म्हणजे असं वाटतं कीं, एकादा दुष्ट स्वभावाचा परमेश्वर, स्वतःच्या लहरीखातर ही मौज मधेंच तर बंद करणार नाहीं ! आणि अशा अनवश्यक विचारानं त्या वेळच्या उल्हासमय मनोवृत्ति भीतीनं धडधडू लागतात. तुमचे आतांचे सुंदर विचार ऐकत असतांना तीच भीति बोंचत होती मला. तुमचं भाषण थांबवून उगीच दुजोरा दिलात तिला."

"हरेराम !" रुचीर मधुर स्मित करीत उद्‌गारला, "असं सारखं बोलत बसायला कांटेकोयलीच बांधली पाहिजे जिभेवर ! बरं आहे; फारच उशीर झाला आज." असें म्हणत नमस्कार ठोकून तो जाण्यासाठीं उभा राहिला. प्रगति पुढें होऊन त्याला म्हणाली, "कांहीं अडचण नसेल तर इथंही जेवण उरकून जातां येईल ! समाधान वाटेल आम्हांला !"

"तुमचं समाधान दुखावतील अशा कसल्याच अडचणी नाहींत माझ्याजवळ !" मनोरम स्मित करीत त्यानें सांगितलें, "संन्याशाला काय सगळींच घरं आपलीं !"

"संन्याशी डोक्यावर असं केंसाचं छप्पर नसतात ठेवीत म्हटलं !" प्रगति विनोदानें उत्तरली, "गुळगुळीत नर्मदेंतला बनवायला पाहिजे त्याला !"

त्यांच्या निर्गमनानंतर ती खोली, कांहीं वेळ त्यांनीं ओतलेल्या हास्यगंधानें बेहोष झाल्याचा भास होत होता.

---

## प्रकरण ६ वें

# थोरांचें हृदय

नगरशेटची हवेली म्हणजे ती काय अशी तशी असेल थोडीच ! तिच्या ठिकाणीं सगळ्या नगराचें वैभव एकवटून दिसलेंच पाहिजे; आणि त्याप्रमाणें मणिभूषणांची हवेली होतीही पण. सबंध शहरांत ती पांच मजली इमारत, मान उंचावून आपल्या मालकाचें वैभव सर्वांपेक्षां अधिक असल्याची ग्वाही देत होती. औरसचौरस एक मैलाच्या टापूंत त्या इमारतीचें वैभव पेरलेलें होतें. सुंदरशी बाग, त्यांतील ती सुरूंची, सोनचांफ्यांची आणि पुष्पवेलींची वगैरे उभी दौलत आणि नाना प्रकारच्या पुष्करणींतून तुषारझाड करून, रसिक मनाला समाधानाच्या गुदगुल्या करणारीं तीं कारंजीं, यांच्या योगानें कोणालाही भुरळ पडत असे. पाचूंच्या प्रभावळींत ज्याप्रमाणें एकादा शुभ्र हिरा उठून दिसतो, त्याप्रमाणेंच त्या हिरव्या वैभवांत ती हवेली दिसत होती. बाह्यांगाप्रमाणेंच अंतरंगाची रचनाही कलापूर्ण अशी होती. तिथला तो थाट राजेरजवाड्यांच्या वैभवालाही तुच्छ लेखीत होता.

दिवाणखान्यांत प्राचीन आणि अर्वाचीन अशा सगळ्या पूज्य विभूतींच्या मनोरम तसबिरी, सुंदरशा भिंतींच्या सौंदर्यांत भर घालीत असल्याचें दिसत होतें; तर शेटजींच्या खासगी महालांत नाना प्रकारच्या शरीरसौष्ठवांच्या अंगनांचें उघडें प्रदर्शन केलेलें होतें! देवखोलींत स्वामी रामतीर्थ, विवेकानंद आणि रामानंदादि सत्पुरुषांचा फुलांनीं गौरव केलेला दिसत होता; तर शय्यागृहांत रंभा, ऊर्वशी आणि मेनका वगैरे सप्ताप्सरांना, स्वेच्छाचारी मनाचें समाधान करणारें वैभव म्हणून अदबीनें लावून ठेवल्या होत्या! सर्वसाधारण सांगावयाचेंच झालें तर असें सांगतां येईल कीं, जगाशीं त्यांची जितक्या प्रकारांनीं वागणूक असे, तितके सगळे प्रकार त्या इमारतीच्या सौंदर्यासाठीं उपयोगांत आणले होते!

या वेळीं मणिभूषण आपल्या खासगी महालांत, जळफळत्या उच्छ्-

वासांनीं तेथील हवा दूषित करीत आडवे पडले होते. स्वरूप आणि प्रगति यांच्या सौंदर्यानें त्यांच्या सहनशीलतेचा चक्काचूर केल्यामुळें ते पशुवृत्तींत जाऊं पाहात होते. त्यांच्या अविचारी मनानें त्यांना बजावायला सुरुवात केली होती कीं, सूडासाठीं तरी त्यांच्या शीलाचा बळी घे; त्यांच्या अघोर मनोवृत्तीही त्याला साथ देऊन मोठ्यानें ओरडत होत्या कीं, जरूर! सूडाच्या चितेवर या हट्टी मुलींच्या शीलाचें दहन झालेंच पाहिजे! त्यांच्या वैभवाचा उन्मादही त्यांना तेंच बजावीत होता आणि त्यांचा मोठेपणाही तेंच प्रतिपादीत होता!

मणिभूषणांच्या हस्तकांनीं त्यांना नुकतेंच कळविलें होतें कीं, त्या दोन्ही मुली रुचीरच्या झाल्या असून काल तर त्याचें जेवणही त्यांच्याकडेच झालें; अन् आणखी पुष्कळच त्यांनीं सांगितलें! दुराचारी माणसाला युक्त्या फार लवकर सुचत असतात. अर्थात् या गोष्टीला मणिभूषणही अपवाद नव्हते. त्यांनीं रुचीरच्या वडिलांना पोरगा कसा बिघडायला लागला आहे, त्याचें दिग्दर्शन करणारें एक बिननावीं पत्र लिहून तें ताबडतोब रवाना केलें. आरंभीं ज्या पत्राचा उडता ऊहापोह आपण वाचलात, तेंच हें पत्र.

पत्र गड्याबरोबर पोष्टाकडे पाठविल्यानंतर मणिभूषण समाधानानें स्वतःशींच हंसले; त्यांत त्यांच्या युक्तीच्या अचूकपणाबद्दलचा स्वाभिमान दृग्गोचर होत होता. अशा प्रकारें आनंदातिरेकाच्या समाधींत स्वारी डुलत असतां, कोणी तरी भेटायला आल्याची वर्दी मिळाली. हंसतमुखानेंच स्वारी दिवाणखान्यांत येऊन दाखल झाली आणि एका तरुणाचा नमस्कार स्वीकारून म्हणाली, "बोला; काय आज्ञा आहे?"

"आज्ञा करायला तेवढा अधिकार कुठून येणार आम्हांला! मी विनंति करायला आलों आहें." त्यानें उत्तर दिलें.

"अहो आपलेपणाचा अधिकार फार मोठा असतो आणि तो तुम्हांला आम्हेही पण! खरं कीं नाहीं?"

"सौजन्य आहे आपलं!" तो तरुण नम्र भाव प्रतीत करीत

म्हणाला. " असो म्हणा तें ! तरुण मंडळातर्फे व्याख्यान आहे रुचिरांचं आज; तेव्हां अध्यक्षीय खुर्ची आपण शोभवावी अशी आमची विनंति आहे. "

" रुचीरसारख्या तडफदार तरुणाचं व्याख्यान आणि मी अध्यक्ष ! छानच योगायोग आहे म्हणायचा हा. प्रतिभेच्या वृद्ध आणि तरुण अशा दोन भावना कल्पून, त्यांची गांठ घालतां आहांत वाटतं तुम्ही ! व्याख्यानाबद्दल वाचलं होतं मीं वर्तमानपत्रांत; पण त्या व्याख्यानाशीं इतक्या जवळचं नातं माझं निघेल, अशी नव्हती कल्पना. पण हो, बरी आठवण झाली; तुम्हीं तरुणांनीं काय संस्थानचं खोबरं करायचं ठरवलं आहे ? "

" आम्हांला आमच्या माणुसकीनं जगायचं आहे ! तशा तऱ्हेनें जगण्याचा प्रयत्न करणं हा जर गुन्हा होत असेल, तर तो आम्ही करणार आहोंत. आपल्यासारख्यांचे शुभाशीर्वाद पाठीशीं असल्यावर, आम्ही कसल्याही परिस्थितीशीं झगडायला समर्थ होऊं. "

" आशीर्वादांची किंमत शब्दांपेक्षां कधींच जास्त असत नाहीं ! पण तें जाऊं द्या. मी जरूर आजचं आमंत्रण स्वीकारतों. वेळेवर येतों मी ! "

नमस्कार प्रतिनमस्कार होतांच त्या तरुणानें निरोप घेतला.

---

## प्रकरण ७ वें

# रुचीरच्या विचारांनीं जिंकलेलें जग

तुफान गर्दी जमली होती व्याख्यानाला. आजचा विषय हा संस्थानच्या दृष्टीनें अतिशय महत्त्वाचा असल्यामुळें व व्याख्यानाचा परिणाम आणि जनमत अजमावण्याचे दृष्टीनें स्वतः संस्थानाधिपति, युवराज आणि कन्या शैलबाला यांच्यासह आजच्या व्याख्यानाला हजर होते; त्यामुळें एकंदर सभेचें वातावरण गंभीर झालेलें दिसत होतें. आजच्या या अपूर्व

योगायोगाबद्दल नाना प्रकारचे विचारतरंग हवेवर तरंगत होते. तरुण कार्यकर्ते मात्र जबाबदारीची जाणीव झाल्यामुळें, अत्यंत दक्षतेनें सभेची व्यवस्था राखण्यांत मग्न झाले होते. मणिभूषणांनीं आपलें अध्यक्षीय प्रास्ताविक निसटतें आणि आटोपतें घेऊन रुचीरला भाषण करण्याबद्दल परवानगी दिली. असंख्य टाळयांच्या कडकडाटांत रुचीरनें सर्वांना अभिवादन करीत बोलायला सुरुवात केली. सुरुवातीचे आभार वगैरे झाल्यावर तो म्हणाला, "मराठी भाषा म्हणजे सदाफुलीप्रमाणें सतत फुलवरलेली एक वेली आहे. तिच्यावरलीं फुलं मीं आधाशीपणानं कितीही ओरबाडून घेण्याचा प्रयत्न केला, तरी त्या योगानं, आजच्या व्याख्यानाचा एकादा सुंदरसा हार तयार होईल कीं नाहीं याची शंका आहे!"

या वेळीं राजकुमारीनें आपल्या भावाजवळ तोंड नेऊन म्हटलें, "काय सुंदर सुरुवात केली आहे नाहीं!" आणि पुन्हां त्यांनीं आपलें अवधान व्याख्यानाकडे दिलें.

"तथापि 'कर्मण्येवाधिकारस्ते।' हा भगवंतांचा आदेश लक्षांत घेऊन मी माझे विचार आपणां सर्वांच्या पुढें मांडतों आहें. आजचा विषय "संस्थानांतील आगामी लढयांत तरुणांची जागा" असा आहे. दहा पांच शब्दांत या विषयाचं उत्तर देऊन आजचं व्याख्यान संपवतां येण्यासारखं असतं, तर मीं फक्त एवढंच सांगितलं असतं कीं, 'अशा लढयांत आम्हीं तरुणांनीं अशा ठिकाणीं उभें राहावें कीं, आमच्या माणुसकीच्या शत्रूंना, आम्हांला गोळ्या घालण्यासाठीं अगर आमच्यावर लाठी चालवण्यासाठीं, फारसे कष्ट पडणार नाहींत!" पण अशा दहा पांच शब्दांनीं व्याख्यान होत नाहीं. व्याख्यान म्हटलं म्हणजे पुष्कळशा शाब्दिक चिंध्यांनीं तयार केलेलं मारुतीचं शेंपूट असायला पाहिजे आणि त्यासाठीं जवळ असलेल्या अकलेच्या शालूच्या धांदोटया काढणं अगदीं अपरिहार्यच आहे! असो."

रुचीरच्या विनोदप्रचुर अशा अस्खलित भाषणानें सगळी सभा मंत्र-मुग्ध नागाप्रमाणें डोलूं लागली होती. त्यानें एकंदर परिस्थितीचें विवेचन करून हा असंतोष सन्माननीय स्वरूपांत कसा नाहींसा होणारा आहे, याचीही मीमांसा केली. जनसमूहावर अतिशय सुंदर परिणाम झाला त्याच्या भाष-

णाचा. खुद्द राजेसाहेब आणि त्यांचा परिवार यांचीही स्थिति वर सांगितल्याप्रमाणें झाली होती. असंख्य टाळ्यांच्या कडकडाटांत त्यानें विश्रांति घेतांच राजेसाहेबांनीं उठून त्याच्याशीं हस्तांदोलन केलें. राजेसाहेबांनींही व्यासपीठावर उभें राहून सांगितलें कीं, "तुमच्या भावनांचा उसळा किती प्रक्षोभकारक रीतीनें उसळूं लागला आहे, तें मला समजलें आहे. तुमचा कोणताही निःस्पृह पुढारी सन्मान्य समेटाच्या वाटाघाटीसाठीं आल्यास त्याला आमची तयारी आहे. आजच्या व्याख्यात्यांचा गौरव जनताजनार्दनानं केलेलाच आहे. त्यांचे अमोल आणि सडेतोड विचार ऐकण्याचा सुयोग ज्यांनीं घडवून आणला, त्या कार्यकर्त्यांचे आभार मानून मी सर्वांचा निरोप घेतों."

सभा विसर्जन करण्यांत आली. सर्वांचा प्रेमाचा निरोप घेऊन रुचीर सभास्थानाबाहेर आला. आतां तो मोटारींत बसणार तोंच त्याची नजर स्वरूप आणि प्रगति यांच्याकडे गेली. त्यानें गाडी तशीच पाठवून दिली आणि स्वतः त्यांच्याजवळ जाऊन उभा राहिला.

मुक्त कंठानें सर्वांनीं केलेली रुचीरची प्रशंसा अजून स्वरूपच्या कानांत घुमत होती. निर्भीडपणा, दूरदृष्टि आणि विषयाचा अभ्यास इतक्या सगळ्या गोष्टी त्याच्या भाषणांत दिसून आल्या होत्या.

"या तुम्ही अशिक्षित!" प्रगति त्याला उद्देशून हंसत म्हणाली, "अशिक्षितांचे विचार बरेच सुशिक्षित असतात म्हणायचे!"

"रुचीर," स्वरूप सलज्जपणें खालीं पाहात म्हणाली, "सरळ घरीं जायचं सोडून इकडं कशाला आलांत! तुमच्या उज्ज्वल कीर्तीला, लोकांच्या दृष्टीनं . . . !"

"देवानं मला स्वतःला जे डोळे दिलेत ते कांहीं लोकांच्या दृष्टीनं विचार करण्यासाठीं नव्हेत." रुचीर निर्मल हास्य करीत चालतां चालतां म्हणाला, "तसल्या गोष्टीच बोलूं नका. दुसरे विषय काय थोडे आहेत बोलायला!"

"का हो रुचीर, व्याख्यान देण्याचा मुळींच अनुभव नव्हता ना तुम्हांला?" विषय बदलण्यासाठीं प्रगतीनें विचारलें.

"तें कांहीं खोटं नाहीं सांगितलं मीं; पण तें मला देतां येणार नाहीं असं कधीं सांगितलं होतं ?"

"म्हणजे मनांत आणल्यावर तुम्हांला वाटेल तें करतां येईल ! असंच की नाहीं ?" स्वरूप म्हणाली. तिला बोलण्यापेक्षां त्याच्याकडे निवळ पाहात राहावेंसें वाटत होतें ! परंतु तेंही जमेना.

"वाटेल तें जरी नाहीं करतां आलं तरी पुष्कळसं करतां येईल ! 'अशक्य' म्हणण्यांत माणसाचा जेवढा वेळ खर्च होतो, तेवढ्या वेळाची प्रत्यक्ष मेहनत पुष्कळशी शक्यता निर्माण करते ! कामाशीं आणि परिस्थितीशीं समरस होणाराला भरपूर मार्ग मिळत असतात ! अनुभव आहे माझा हा. अवघड म्हणून ज्या वाटा सांगितल्या जातात, त्याच मनुष्याच्या कर्तबगारीच्या वाटा असतात ! आपली बुद्धि रूढीच्या विशिष्ट मर्यादेंत कोंडून ठेवणं हा कर्तबगारीचा आणि जन्माचा कोंडमारा आहे, नव्हे गुन्हा आहे ! क्षेत्राची मर्यादा सोडून, या विस्तीर्ण जगांत जेथें जेथें जें जें चांगलं असेल, तेथें तेथें जाऊन तें शोधून वेंचून घेणं, म्हणजेच बुद्धीचा सद्व्यय करणं आहे !"

रुचीरनें अशा तऱ्हेनें स्वरूपचें समाधान केलें. तिच्या कमकुवत शंकांना मिळालेलें उत्तर फारच गोड असल्यामुळें, समाधानानें सुन्न होऊन गेली ती. जगांत सन्मानानें जगायलाही वाव मिळू शकतो असें तिला नक्की वाटूं लागलें. तिचे डोळे आशेच्या किरणांनीं चमकूं लागले. ती मनांत म्हणाली, "रुचिरांना कुणी अशिक्षित म्हणतं ! यांच्यापेक्षां निराळे विचार वागवण्यांत जर सुशिक्षितपणा समजला जात असेल, तर अशिक्षित असणंच बरं ! भरपूर शिक्षण घेऊनही ज्यांचीं मनं प्रगतिपथानं जायला लाजतात आणि अडखळतात, त्यांचं हृदयच अशिक्षित म्हणायला पाहिजे !"

"मग काय रुचीर," घर जवळ आलें असें पाहून प्रगति म्हणाली, "घरीं जाऊन स्वतः हात भाजीत बसण्यापेक्षां चला ना आतां आमच्याकडेच !"

"चालून आलेल्या दैवाला कोण हांकून लावील उगीच !" तो सस्मित म्हणाला, "पण हें हंगामी वैभव माझी नेहमींची अडचण कशी दूर करणार ?"

" हंगामापुरतंच आमंत्रण आहे माझं ! " प्रगति कोमल हंसें उधळीत म्हणाली, " नेहमींच्या वाटचालींत एक विसांव्याची जागा म्हणून पत्करा झालं ! "

" संकट आल्याखेरीज तें टाळतां येत नाहीं आणि आमंत्रण स्वीकारल्या-खेरीज संपवतां येत नाहीं ! तुमच्याकडून आणखी येणारीं आमंत्रणं संपवण्यासाठीं हें पत्करलंच पाहिजे ! " रुचीरनें युक्तिवाद केला.

" प्रत्येक वेळीं असं स्पष्ट सांगावं म्हणजे झालं ! " स्वरूप म्हणाली. आणि तिघेही मनापासून एकमेकांकडे पाहात हंसलीं.

फाटकांतून आंत शिरतांना कसलें तरी गाणें गुणगुणत होता रुचीर ! आणि वाराही गोड लहरींनीं वाहात होता !

---

## प्रकरण ८ वें

# भावनांचें घर्षण

निशादेवी दिवसाच्या विश्रांतीसाठीं बऱ्याच वेळापूर्वीं बिछान्यावर गेली होती. आतां बिलालपूरच्या गांवकुसाला असलेल्या कृष्ण-तडागांत सूर्याचे कोवळे किरण पोहण्यासाठीं उतरले होते आणि इतका वेळ वाहात असलेला गार वारा, आतांसा कुठें उष्ण श्वास सोडायला सुरुवात करू पाहात होता. अशा या मंगल प्रसंगीं रुचीरनें कपडे काढून अंगावर स्वीमिंग-ड्रेस चढवला आणि कोणीही जेथून उडी घ्यायला धजत नव्हतें अशा ठिकाणी जाऊन तो उडी घेण्याच्या पवित्र्यांत उभा राहिला; तोंच त्याला इतका वेळ त्याच्या हालचालीकडे अनिमिष नेत्रांनीं पाहात असलेल्या राजकुमारीने हांक मारली. त्यानें दचकून मागें पाहिलें, आणि स्मितपूर्वक अभिवादन करून विचारलें, " मला हांक मारलीत आपण ? "

"होय, कसलं धाडस करतां आहांत हें ! निष्कारण जीव धोक्यांत फेंकायला तो काय बिनकिंमतीचा आहे ?"

"याच्यांत कसला आलाय धोका ! तो माझा नित्याचा क्रम आहे."

"सगळीं संकटं काय तुम्हीं आपल्या कामाला जुंपलीं आहेत वाटतं ! अगदींच भय वाटत नाहीं तुम्हांला ?"

"भय वाटेल म्हणा; पण तें प्रथमचं आणि अखेरचं असं एकदम वाटेल." असें म्हणून त्यानें थोडेंसें मनोरम हंसें छेडलें. तीही त्याच्याकडे अगदीं एकनजरेनें पाहात राहिली. त्याची ती भरदार छाती, विशाल बाहू आणि रुंद रुंद खांदे, हे कसल्याही संकटांचें ओझें सहजासहजीं घेऊन जाणारे खंदे कामकरी आहेत, अशी तिची खात्री झाली. तिनेंही आपला पोहण्याचा पोषाख चढवलेला होता. ती अस्फुट स्मित फेंकीत म्हणाली, "मीही करतें येथून उडी घेण्याचा प्रयत्न आज. करूं का ?"

सतत निर्मल हास्याचा अनुवाद करीत राहणारें त्याचें मन एकदम बावरलें. तो अजीजीनें म्हणाला, "पण या वेडच्या प्रयत्नावांचून काय नडलं आहे ? पाहिजे तर आपण दोघेंही हा कडा टाकून, त्या तिकडे वहिवाटींतल्या जागेवर जाऊं या !"

"अं हं !" ती मान वेळावीत हंसत म्हणाली, "आज याच जागेची पूजा बांधली आहे माझ्या मनानं ! अन् हें हो काय रुचीर ! दिलीपराजासारखे उदार हृदयाचे, विशाल बाहूंचे आणि निधडचा वृत्तीचे, पाणोळे म्हणून तुम्ही जवळ असतांना मला कसलं भय ? मी घेणार उडी येथून !" तिचा हा लाडका आणि अविचारी हट्ट ऐकून तशाही स्थितींत रुचीरला हंसूं आलें अन् तीही हंसली ! जणू काय दोघांच्याही मधुर भावनांच्या घर्षणांतून बाहेर पडलेल्या रम्य ठिणग्याच होत्या त्या ! ती त्याच्याकडे आणि तो पाण्याकडे अगदीं एकाग्र मनानें पाहात उभे होते. अखेर ती ऐकत नाहीं असें पाहून तो म्हणाला, "आतां एवढं तरी ऐका, प्रथम मी उडी घेतों आणि नंतर मीं सांगितल्यावर तुम्ही उडी टाका. कडचाचा सुळका जरा पुढं आलेला आहे; तेव्हां जरा दुरून पळत येऊन, पाण्याचा मध्य लक्षून उडी घ्या; म्हणजे बरोबर येईल. मी आहेंच. होऊन जाऊं द्या तुमच्या मनाजोगं !"

" What a beautiful idea ! " ती हर्षस्वरानें उद्गारली, " पण रागावूं नका हं माझ्यावर या हट्टाबद्दल ! सांगा, नाहीं ना रागावणार ? "

" पुष्कळ वेळां मी निश्चय करतों रागावण्याचा; पण तें कांहीं तितकंसं साधत नाहीं मला ! " त्यानें उत्तर केलें, " आणि यदाकदाचित् आलाच राग, तर तो कांहीं टिकत नाहीं. झाडांचीं पिकलेलीं पानं ज्याप्रमाणं वाऱ्याच्या सहवासानं देखील गळून पडतात, त्याप्रमाणं निर्दोष जिवांच्या विनोदलहरींनीं माझ्या रागाचीं पानं गळून पडतात ! "

" फारच सुंदर कल्पना आहे हं ही ! अन् कालच्या व्याख्यानांतही तुम्हीं अशाच सुंदर कल्पना वेंचल्यात ! महामूर सांठवण दिसते आहे जवळ ! "

" महामूर म्हणजे काय, कोणत्याही म्युनिसिपालिटीच्या हयातीला पुरेल तो कचरा ! असा स्वीमिंग-ड्रेस घालूनही तो उपसतां नाहीं येणार ! हं चला, टाकतों मी उडी आतां. "

त्यानें झटपट उडी फेंकली आणि पाठोपाठ त्याची सूचना येतांच तिनेंही टाकली. गैरमाहीतगारपणाचा थोडासा प्रसाद बसलाच तिच्या पायाला; पण एकंदरींत पुष्कळच समाधानकारक प्रयत्न साधला. रुचीरही पोहतां पोहतां तिला उत्तेजन देण्यासाठीं ओरडला, " छान छान ! पायाला बरंच लागलं वाटतं ? "

" विचार करण्यासारखं नाहीं कांहीं ! " तिनें तुषार झाडीत सांगितलें. रुचीरनें स्नान आटोपून कपडे बदलायला सुरुवात केल्याचें पाहून ती म्हणाली, " आतां मीही पण लवकरच आटपतें हं रुचीर ! बरोबरच जाऊं या आपण. "

आणि खरोखरच तिनें झटपट उरकलें. लवकरच त्यांची टूरिंग मार्गानें पळत निघाली. स्वतः राजकुमारी ड्राइव्ह करीत होती; पण ती जागा चीरनें घेऊन तिला त्या कलेंतील आपलें प्रावीण्य दाखवून चकित केलें.

एकदम मोटर थांबलेली पाहून तिनें विचारलें, " कां, बंगल्यावर नाहीं येत ? "

" आतां नको; " त्यानें सलील हास्य करीत उत्तर दिलें, " पुन्हां केव्हां तरी. "

" पुन्हां कसले येताहांत ! उगीच समजूत घालतां माझी ! "

" पाहिजे तर वचन घ्या माझं. मी फसवणार नाहीं या बाबतींत. "

" बरं तर; पाहूं याच आतां ! "

" कांहीं हरकत नाहीं. "

तो झटकन् निघून गेला आणि थोड्याच अंतरावरून स्वरूप आणि प्रगति चालल्या होत्या त्यांच्या हास्यविनोदांत मिसळून चालू लागला.

राजकुमारीनें तें पाहून आपल्याशीं म्हटलें, " असं आहे होय ! "

---

## प्रकरण ९ वें

# बंधुप्रेम

सूर्याचीं किरणें पार पुसून गेलीं होतीं. रातराणीनें, तिच्या नजरेंत भरलेल्या अणुरेणूलासुद्धां स्वतःच्या महालांत हितगुजासाठीं जवळ केलें होतें. वारा गार फवारे फेंकीत समाधान हंसवीत होता. आणखीन् कांहीं वेळानें मानवी सुखदुःखें विश्रांतीसाठीं शय्येवर चढणार होतीं ! रुचीरही आणखी थोड्या वेळानें जेवण उरकून विश्रांतीसाठीं जाणार होता; इतक्यांत बंगल्यासमोर एक टांगा येऊन उभा राहिला. रुचीर गॅलरींत येऊन, कोण आलें म्हणून पाहातो तों वसंत टांग्यांतून उतरतांना दिसला. त्याच्या अनपेक्षित आगमनानें फारच आश्चर्य वाटलें त्याला. तेवढ्या क्षणाच्या फुरसतींत किती तरी जातींच्या शंका धांवत आल्या त्याच्याजवळ.

वळकटी आणि बॅग घेऊन येणाऱ्या गड्याच्या मागोमाग वसंत आंत शिरत असतां म्हणाला, " काय विठू, दादासाहेब काय करताहेत ? तब्येत वगैरे ठीक आहे ना ! "

पण त्याला प्रत्यक्ष रुचीरनेंच पुढें होऊन उत्तर दिलें. स्वतःची तब्येत

व्यवस्थित असल्याची ग्वाही देतांना, त्याच्या सहज स्मिताची तुषारफेंक इलेक्ट्रिक लाइटमध्यें इतकी मनोरम दिसत होती कीं, त्याच अपेक्षेनें सतत त्याच्याकडे पाहात राहावें.

"तू असा एकाकीच कसा आलास ? घरची सगळी मंडळी खुशाल आहेत ना ! " त्यानें विस्मयाविर्भावानें विचारलें.

"सगळीं खुशाल आहेत. तुमच्याच शिकारी दुखण्याचं समजल्यामुळं पाठवलं आहे मला. बराच मार बसला होता वाटतं पायाला ! " कपडे उतरीत खालीं बसतां बसतां त्यानें पृच्छा केली.

"बसला होता जरासा, पण तुम्हांला कसं समजलं ? "

"कुणी तरी भेटलं होतं बाबासाहेबांना. समजल्यावर मग कुठला दम निघायला ! आईच निघाली होती बरोबर यायला; पण मग तेच म्हणाले, तसं नको म्हणून. मला ताबडतोब तार करायला बजावलं आहे."

"ठीक ! निष्कारण काळजी आणि धांवाधांव नको, म्हणून जें करायला गेलों, तेंच गळ्याशीं आलं ! " रुचीर म्हणाला, "बरं; तूं आतां हातपाय धुऊन चहा घे. मी विठूला पाठवून तार करवतों. बरोबरच जेवण उरकूं आतां ! "

वसंतचा होकार घेऊन तो तजविजीला लागला. तार ऑफिसांत तार पाठवून दिल्यानंतर तो परत त्याच्याजवळ येऊन बसला. त्या दोघांचें संभाषण ऐकणाराला त्यांच्या एकमेकांविषयींच्या प्रेमाबद्दल खात्री पटून त्याबद्दल कौतुक करावेंसें वाटलें असतें. ते हृदयानें अगदीं अभिन्न असेच वागत होते. फुलांतली कोणतीही पाकळी गळून पडली असतां, तें विद्रूप होतें त्याचप्रमाणें या भावंडांचें होतें. कोणाला कसल्याही यातना झाल्या, तरी आपलें स्वतःचेंच सुख हरवलें आहे, असें प्रत्येकाला वाटत असे. त्या भावंडांचे स्वभाव म्हणजे एकमेकांच्या श्वासोच्छ्वासानें जगणाऱ्या वनस्पतीच होत !

"पण तुम्हीं तुमच्या दुखण्याबद्दल कळवायला पाहिजे होतं. नाहीं का ? " वसंतानें बोलतां बोलतां विचारलें.

" कळवायला पाहिजे होतं खरं; पण म्हटलं कशाला उगीच काळजींत गोंवा सगळ्यांना ! " मधुर हास्य करीत रुचीर म्हणाला.

" जिव्हाळा म्हणून ज्याला म्हणतात, तो कांहींच आमच्या गांवीं पिकला नाहीं वाटतं ! तुम्हांला बोलवतं तरी कसं असं ? तुमच्या यातना हें काय आमच्या सुखाचं साधन आहे वाटतं ? तार मिळेपर्यंत आई अन्नपाणी तरी घेते कीं नाहीं याची शंका आहे. आम्ही भाराभर माणसं घरांत असून तुमच्या सेवेसाठीं जवळ एकही नसावं, हें काय आम्हांला सुखावह वाटलं असेल होय ! " डंवरलेल्या डोळ्यानें रुचीरकडे पाहात वसंत चिडून म्हणाला.

" वेड्यासारखं कांहीं तरी बोलूं नकोस असं. " रुचीरनें नजर एका बाजूला वळवून म्हटलें. आवाज थोडासा घोगराच आला या वेळीं त्याचा. " तुमच्या सगळ्यांच्या प्रेमळ भावना विस्कटून जाव्यात, असं मला स्वप्नांतही वाटणार नाहीं. माझी चूक झाली हें खरं; पण तिच्या हेतूकडे पाहून तुम्हीं सगळ्यांनीं मला क्षमा नको का करायला ! डॉक्टर स्वरूप पेडणेकर आणि तिची बहीण, यांनीं माझ्यासाठीं घेतलेले कष्टच तुमची सगळ्यांची आठवण आणून देत होते. विठूनेंही अत्यंत खस्ता ओढल्यात माझ्या; पण या सगळ्या वस्तुस्थितींत देखील उतार वाटेनं धांवणाऱ्या पाण्याप्रमाणं माझें चित्त तुमच्याकडेसच धांवत असे. तुमच्या सगळ्यांच्या सहानुभूतीचा आणि आशीर्वादांचा हव्यास धरून असणाऱ्या या मनाला, इथं जरी समाधान वाटत असलं, तरी तें पुरेसं कसं असूं शकेल ? नुसत्या चंद्राचं चांदणं, चांदण्यांच्या लुकलुकीवांचूनही अपुरं वाटतं ! आणि हा तर जिवंत जिव्हाळ्याचा प्रश्न. "

" तुमच्यावर रागवायचा अभ्यासच करायला पाहिजे आम्हांला आधीं ! " वसंत मधुर हास्य उधळून म्हणाला, " तुमच्या वक्तृत्वाच्या सुगंधानं आमच्या दुबळ्या आणि प्रेमळ रागाचं पार पाणी होऊन जातं ! "

" आतां राहूं दे तो विषय. पोटाची पूजा व्हायला पाहिजे प्रथम- जीव कसा दमून गेला आहे बघ अगदीं ! "

दोघेही उठून जेवायला गेले.

---

## प्रकरण १० वें

# हा निसर्गाचाच नमुना

रुचीर कोठें तरी कामासाठीं म्हणून अगदींच पहांटेस निघून गेला होता. नित्याप्रमाणें सगळीं गडी माणसें कामावर पांगलेलीं होतीं; आणि वसंतही अगदीं सकाळींच उठून वर्तमानपत्रांतल्या बातम्या वेंचीत बसला होता. अशा समयीं प्रगति आंतल्या आवाजानें कवालीचे सूर छेडीत दाराजवळ आली अन् शेवटचा सूर वातावरणांत फेंकून देऊन ती नेहमींच्या खोडकरपणानें म्हणाली, "अहो रुचीर." पण ती ताबडतोब थबकली. रुचीरचे ऐवजीं दुसराच तरुण तिच्या दृष्टीस पडल्यामुळें ती ओशाळली, बावरली... अन् लाजलीही पण! बिचकलेली मनस्थिति एका ठिकाणीं गोळा करण्याचा प्रयत्न करीत ती पुढें म्हणाली, "इश्श! मीं म्हटलं रुचीरच म्हणून! कुठं बाहेर गेले आहेत वाटतं?"

"कोण, दादा होय? ते बऱ्याच वेळापूर्वीं बाहेर गेले आहेत. आतां येतील परत इतक्यांत." वसंतानें उत्तर केलें. तो पुढें म्हणाला, "या ना! बसा आंत. येतीलच ते आतां!"

प्रगति एका कोंचावर बसतां बसतां म्हणाली, "आपण त्यांचे बंधु वाटतं? तरीच!"

"होय, मी धाकटा भाऊ त्यांचा. मला वसंत म्हणतात."

"आपण कॉलेजमध्यें आहांत नाहीं पुण्याला! सांगत होते रुचीर असं."

"होय."

"मीही पण पुण्यासच असतें परशुराममध्यें." तिनें स्वतःच्या ओळखीची प्रस्तावना जोडली.

"असं होय!" वसंत उद्‌गारला. "मग तर जरूर तुमची ओळख टिपून घेतली पाहिजे."

"म्हणजे ब्लॉटिंगनं कीं काय!" तिनें हंसत पृच्छा केली.

"होय; स्मृतीचा ब्लॉटिंग वापरणार आहें मी. आतां एवढी सुटी

पाठमोरी झाल्याबरोबर पुणं पाहायला पाहिजे आपल्याला. " वसंत तिला उद्देशून म्हणाला. मनमोकळेपणा हा तारुण्याचा निसर्ग आहे. विनाकारण गंभीरपणा, अनाठायीं लज्जा, आणि भलत्या वेळीं विनम्रपणा, हे निसर्ग-प्रवाहांतील दोषांचे धोंडे आहेत! ते ज्यांच्या कपाळीं बसतील त्यांच्या-सारखे हतभागी, जगांत दुसरे नाहींत. प्रत्येक दृश्य वस्तु म्हणजे निसर्गाच्या टांकसाळींतलें परस्पर संबंधानें निगडित असलेलें नाणें. नाणें निर्जीव असल्या-मुळें किमतीच्या प्रमाणानें आपण त्यांचें नातें ओळखतों; परंतु या सजीव नाण्यांचें तसें नाहीं. थोडयाशा सहवासानें उभयतांच्या जुळत्या भावनांचें घर्षण होऊन त्यांतूनच योग्य नातें निर्माण होतें. वसंत आणि प्रगति यांच्यां-तील संभाषणानें हेंच प्रत्ययाला येत होतें. हा निसर्गाचाच नमुना असल्यामुळें तो स्पृहणीयच समजायला पाहिजे! कारण निसर्गाला बंधन नाहीं.

जमिनीकडे दृष्टि देऊन थोडीशी वांकडी मान करीत ती त्याला म्हणाली, "पण, परिचयाच्या जुन्या आठवणीनं ओळख तरी संभाळाल का! का आपलं पाण्यासारखं, ज्या भूमीचा रंग लागेल त्या रंगानं धांवाल!"

"हें पहा, पुराचं पाणी आणि माणसाची बुद्धि, हीं कधींही स्थिर असत नाहींत; त्यांना पाहिजे तसं वळण लावतां येतं. त्या दृष्टीनं तुम्हांला न विसरण्याचा मी जरूर प्रयत्न करीन." हंसत हंसत तो म्हणाला.

"उभ्या जन्मांत ओळख विसरणार नाहीं मी आतां!" असें उत्तर ऐकण्यासाठीं अधीर झालेल्या तिच्या भावना मलूल झाल्या एकदम. त्याच्या उत्तरानें ती हंसली म्हणण्यापेक्षां तिनें तसा प्रयत्न केला, असेंच म्हणावें लागलें असतें. "समवयस्क, जवळ जवळ समाध्ययनी आणि जवळ जवळ सम-स्वभावी, अशांच्या स्नेहमय ओळखी उपभोगायला मिळाव्यात," अशी आशा करणें गैर आहे काय? असा तिनें स्वतःशीं हळूच प्रश्न केला!

आपल्या उत्तरानें प्रगतीला बरें वाटलें नाहीं, हें लक्षांत येऊनच कीं काय कोण जाणें; तो पुढें म्हणाला, "कसल्या तरी जखमेनं माणसाला जितकी एकमेकांबद्दल स्मृति राहील अगर सहानुभूतीची ओढ लागेल, तितकी ती दुसरी कशानंही लागणार नाहीं!"

"अग बाई! हा तर अगदीं अभूतच युक्तिवाद म्हणायला पाहिजे!"

आपलें अनावर हंसें सांवरीत ती म्हणाली. "जखमेनं सहानुभूतीची ओढ लागणं तर दूरच राहील; पण सूडाच्या भावना मात्र निखारा जवळ घेऊन फिरूं लागतील!"

"हं! पुण्यासारख्या ठिकाणी कॉलेजच्या वांवरांत फिरणाऱ्या सुशिक्षित मुलीला, न शोभणारं उत्तर आहे हें!" आतां त्यानें उधळलेलें हास्यतरंग तिला इतके मनोवेधक वाटले की, ती तिकडे पाहातच राहिली वेड्यासारखी.

"काय, खरं आहे ना मी म्हणतों तें!" त्यानें फिरून विचारलें.

"बरं! असूं द्यात आम्ही आपल्या अडाणीराम!" तिनें मानेला एक गोडशी मुरकण देऊन म्हटलें.

ओळखीचा अल्पकाळ कुठें तरी स्मृतिआड दडला होता आतां. दोघेंही जुन्या परिचयानें बोलत होते.

"आम्हांला कुठें जखमांचं समाधान लाभलं आहे अजून!" ती आणखीन् म्हणाली.

"अजून नसेल लाभलं तर इथून पुढं लाभेल. कांहीं जखमांनीं वेदना होऊन त्वेष आणि सूड या भावना उगवतात, तर कांहीं जखमा अशा कांहीं गोड संवेदना उत्पन्न करतात कीं, अशा जखमा वारंवार व्हाव्यात म्हणून सत्यनारायण मांडायला तयार होतं कुणी तरी!"

"इश्श!"

"म्हणजे मी काय मर्यादेचं सर्पण करून बोललों वाटतं! स्मृतींच्या खडकांवर चिरंतन कोरल्या जाणाऱ्या ओळखी म्हणजे सुंदरशा जखमाच होत!"

प्रगति तोंडाला पदराच्या सोग्याचा बोळा देऊन मनसोक्त हंसत होती. रुचीर आणि वसंत या दोन भावांतील वक्तृत्वनैपुण्याचें साम्य तिला ताबडतोब दिसून आलें. मनांतल्या मनांत तुलना सुरू केली तिनें. रुचीरच्या नजरेंतला करारीपणा याच्यांतही दिसून येत होता; तथापि वयाच्या प्रमाणानें त्यांतही बाल्याचा खोडकरपणा खेळत असल्यामुळें, रुचीरप्रमाणें त्याच्या नजरेचा ठसा दुसऱ्याच्या मनांवर जलद उमटत नसे. रुचीर अवखळपणें कोणतीही

गोष्ट आधीं करीत नसे आणि पूर्ण विचारांतीं एकादी गोष्ट त्यानें ठरविली म्हणजे तो कधीं मागेंही घेत नसे; उलट वसंताची खेळकर आणि अननुभवी परंतु निष्पाप मनोवृत्ति, अविचारच फार करीत असत. रुचीर हेतुप्रधान आणि भावनाप्रधान होता; तर वसंत निव्वळ भावनाप्रधान होता. तेजस्वी डोळे, भरदार छाती, दीर्घ बाहू, मजबूत हाडपेर आणि गौर कांति वगैरे सर्वसाधारण वस्तुस्थितींत मात्र दोघांही भावांचें फार साम्य दिसून येत होतें.

वसंताची अस्खलित आणि निर्विष अशी विनोदमिश्रित वाग्गंगा वाहात असतांना ती त्याला हास्याची साथ करून उत्तेजन देत होती. अखेर तो थांबला असें पाहून ती म्हणाली, " जाऊं द्या हें जखमांचं पुराण ! "

" कां ! जाऊं द्या कां ? "

" कारण माझी अशी इच्छा आहे कीं, माझ्या ओळखीची जखम कधींच भरून निघूं नये ! "

" असं असं होय ! " तो म्हणाला, " मग आपण दोघेंही प्रार्थनाच करूं या परमेश्वराची या इच्छेनें ! "

" नुसती प्रार्थनाच काय पूजासुद्धां बांधायला तयारी आहे माझी ! ती म्हणाली.

" मग मी काय फुलं गोळा करूं म्हणतां ? "

" कुठलीं ! अन् कसलीं फुलं वेंचणार तुम्ही ! " तिनें हेतुपुरःसर विनोद केला आणि उत्तराची अभिलाषा धरून, ती नजर उचलून त्याच्याकडे पाहात राहिली. प्रश्नाचा व्यापकपणा लक्षांत घेऊन त्यानें शांतपणें उत्तर दिलें, " गुणाचीं फुलं जिथं सांपडतील तिथं जाऊन वेंचलीं पाहिजेत ! ती पूजेला योग्य आहेत एवढं समजल्यानंतर, बाकीच्या बावळट शंका मुकाट्यानं जाळून टाकल्या पाहिजेत. समजा, एक गुलाबाचं झाड शेणकईत जन्माला आलं आहे, म्हणून तें आणि त्यावरील फुलं, हीं त्याज्य समजतां येतील ? अशिक्षित हृदयांतूनच असले निनाद निघतील ! स्पष्टच सांगायचें तर, स्वतःचे अनंत अपराध माहीत असूनही क्षमेची अपेक्षा करणाऱ्या मानवी संस्कृतीला, पापांतल्या पूज्य गोष्टींना नाक मुरडण्याचा अधिकारच असत नाहीं ! सूक्ष्म दष्टीनें पाहिलं तर सद्‌गुणी सुमनं ज्या वेलीवरून जन्माला

येतात, त्या वेलींना घाण जागेंत आणि परिस्थितींत वाढवण्याची कर्तबगारी बहुतेक नामधारी कुलवंत आणि सोवळे शीलवंत यांचीच असते ! ”

“ अतिशयच व्यापक विचार मांडलेत या साध्या गोष्टीवर ! ” तिला कसेंसेंच वाटून ती म्हणाली.

“ ही साधी गोष्ट समजतां तुम्ही ! ” तीक्ष्ण दृष्टीनें पाहात तो म्हणाला, “ आश्चर्य आहे ! मानवी संस्कृतीवर जबर आघात होतो आहे या पागलपणानं. स्वतः केलेलें खरकटें न काढतां, जागाच खरकटी म्हणून ती टाकून प्रत्येक वेळीं नवी जागा खरकटी करीत जाणं, याचा अर्थ अखेर काय करायचा ! सगळ्या घाणीचे जन्मदाते आपणच ना ? पण आपल्या या कर्तबगारीला परमेश्वर कधींच वश होत नाहीं. तो असल्या जागांतूनही सद्‌गुणांची निपज करीत असतो. त्याच्या या कृत्याचा अर्थ असा कीं, प्रत्येक जागा सद्‌गुणांच्या निर्मितीसाठीं असून, मी माझ्या इच्छेप्रमाणं ती शोभवीत राहीन ! डोळे असतील तर उपयोग करा. अशाच ठिकाणांतून सुंदर फुलें सांपडतील ! ”

“ सहज बोलण्यांतनं गंभीर विषय उकरला गेला ! पण फायदाच झाला माझा त्यामुळं. आपले अतिशय उदार विचार ऐकायला मिळाले. ” प्रगति म्हणाली.

“ सहज बुद्धीला पटणारे विचार आहेत हे. मी सामाजिक विषयांचा अभ्यास करणारा विद्यार्थी आहें. यांत कांहीं विचार अपरिपक्वही असतील; पण त्यांची संगति बरोबर आहे ! ”

“ आतां मात्र आपण एकमेकाला न विसरण्याचं वचन द्यायला पाहिजे ! ” ती अस्फुट हंसें करीत म्हणाली, “ इतका वेळ आपण ऐकवलेल्या विचारांनीं परिचयाला जुनेपणा यायला कांहीं हरकत नाहीं आतां ! ”

“ विसरण्याचं वचन देऊनसुद्धां विसरतां येणार नाहीं आतां एकमेकांना ! पण परिचय मात्र जुना होऊं द्यावा असें वाटत नाहीं मला ! प्रत्येक गोष्टींत नावीन्य ओतीत गेल्यानंच आशांचा विलास साजरा होऊन मनाचं समाधान होत असतं ! आपण आपल्या ओळखींत, प्रत्येक फुरसतीला नावीन्य भरण्याचा प्रयत्न करूं या ! ”

"या वृत्तीनं भावना नेहमींच अतृप्त राहतील, असं नाहीं वाटत आपल्याला ? "

"पूर्णत्वाला जोडूनच विलय असतो. त्यापेक्षां अपूर्णांतील पूर्णतेच्या आशा काय वाईट ! 'आतां हें फूल उमलल्यावर असें दिसेल' ही अपूर्णांतील पूर्णतेची आशा किती मोहमयी आणि सुखावह आहे ! "

निरुत्तर होऊन गेली ती त्याच्यापुढें. कांहीं तरी बोलून त्याला बोलत ठेवावें ही इच्छा तर खरीच; पण तें 'कांहीं तरी' काय तेंच सुचेना तिला. उत्कृष्ट विचारवैभवांतून होणारा भावना-विलास तिच्या बुद्धीला दिपवीत होता. ती मनांत म्हणाली, "विचारसौंदर्याचं अपरिमित वैभव, हेंच का यांचं जीवन ! विचारांनंतर उच्चार आणि नंतर आचार; या तीनही अवस्थांतून जाऊं शकतील का हे ! न कां जाईनात ! मला काय त्याचं ! घटकेच्या ओळखीवर आशा वाळत घालायची, ही चूकच नाहीं का ! या वाटेवरून मन माघारी फिरेल का आतां ! पण खरंच का मला कांहीं होतं आहे ! इश्श ! माझे विचार म्हणजे भाराभर चिंध्याच झाल्या आहेत आतां ! अतिपणाच्या मातींत आहे हेंही नामशेष होण्यापेक्षां नुसत्या ओळखीचा स्नेहच कायम ठेवणं बरं ! "

आणि काय वाटेल तें ! पुष्कळच विचार धांवत गेले तिच्या मनांतून ! अखेर कांहींच न सुचून ती म्हणाली, "अगबाई ! केवढा तरी वेळ झाला हा ! अजून रुचिरांचा पत्ता नाहीं. मी जातें आतां. माझ्या ओळखीची जखम न बुजो म्हणजे झालं ! " असें हंसत हंसत म्हणत ती जाण्यासाठीं म्हणून उभी राहिली.

"आपण दोघेंही प्रार्थनाच करूं या तशी ! " तो तिला निरोप देण्यासाठीं उभा राहून विनोदानें म्हणाला.

"Thanks ! " असें म्हणून तिनें मानेला एक मजेदार झोंका दिला आणि दाराबाहेर पाऊल टाकलें. तिच्या मधुर गतीकडे पाहात तो बराच वेळ दरवाज्यांत उभा होता.

---

## प्रकरण ११ वें

# रुचीरचे विचार

प्रगति घरीं येते तों तिला बागेंत रुचीर आणि स्वरूप एका बांका-वर बसून बोलत असल्याचें दिसलें. रुचीरकडे पाहतांच तिला फिरून मघांची दोघा भावांची तुलना आपल्या मनाशीं करावीशी वाटली. आणखीही कसल्या तरी विचारांची वीज तिच्या डोक्यांत चमकून गेली. तिचें मन आतां या नव्या वाटेनें चालू लागलें. आशामय विचारांची मधुरता तिच्या मुद्रेवर विलसूं लागली. रूढीच्या विषमय प्रचारानें, आपल्या या सुखमय आशांना पदोपदीं किती कांटेकुंपणांतून जावें लागेल, याचा विचार तिला या वेळीं सुचला नाहीं. ती स्वतःशीं भावी काळाचें एक अनुपम चित्र चितारून पाहात होती. वेडे मुली, बोरी, बाभळी आणि सराटे, यांचेंच पीक अमाप आलेलें असतें या स्वार्थी दुनियेंत. गुलाब, जाई, जुई यांच्यासारखीं निष्पाप आणि सौंदर्यपूर्ण फुलें, म्हणजे हृदयशून्य मानवांच्या विलासवेळीं, सहजावारी चुरगळण्यासाठीं जगांत जन्माला घातलेली एक जात! माणसांच्या नीति-मत्तेची (!) आणि कलासक्त (!) हृदयाची बडेजावी खुलविण्याचा एक मार्ग! कर्तव्याच्या घमेंडीनें थकलेल्या काळ्या हृदयांचें एक विश्रांतिस्थान! आणि अधमपणाचा मुशाहिरा! आणि काय वाटेल तें! पण हें कटु सत्य, सुखमय विचारांत वावरत असतांना तुझ्या कुठून लक्षांत यायला! पुष्पांच्या उमलत्या क्षणाच्या आनंदाबरोबरच, त्यांना चुरगाळून मातींत फेंकणाऱ्या हृदयांचें शौर्य स्पृहणीय ठरविणाऱ्या रूढीच्या कायद्यांना धन्यवादच द्यायचे असतात!

पण हें समजायला तिचें चित्त कुठें ठिकाणावर होतें! विचारांच्या उन्मादक गुंगींत चालणाऱ्या माणसाला ठेंच बसतांच, तो जसा शुद्धीवर येतो, त्याप्रमाणेंच प्रगतीला रुचीरच्या वाक्याची ठेंच बसून ती शुद्धीवर आली आणि पाहाते तों आपल्या अंवतीभंवतीं नेहमींच्याच भुतावळीनें गजबजलेलें स्मशान!

"रुचीर, पुष्प पुष्कळ चांगलं आहे, पण त्याच्याभोंवतीं कांट्यांचा

खच पडला आहे. पाय पडला कीं चाळण होईल अगदीं ! " भाषणाच्या पूर्वानुरोधानें स्वरूप म्हणाली.

" हरकत नाहीं. " रुचीर म्हणाला, " नवीन वाट पाडायची म्हणजे सुरुवातीच्या प्रवाशांना प्रसाद मिळायचाच. अडचणींत वस्तु आहे आणि ती आयुष्याच्या पूर्ततेंतील एक आवश्यक वस्तु आहे, इतकं पटल्यानंतर तिच्या प्राप्तीसाठीं कष्ट करणं क्रमप्राप्तच आहे. नाहीं वाटत तुम्हांला असं ? "

" ही एक बाजू झाली; पण याच्या उलटही बाजू आहेच कीं ! " स्वरूप म्हणाली, " आयुष्याची पूर्तता, त्याच वस्तूनं व्हायला पाहिजे असा दुबळेपणा तरी कां ? मोकळ्या जागेवर ती उणीव भरून काढणाऱ्या काय वस्तूच नाहींत ? विकाराच्या आहारीं जाऊन नसता हट्ट धरण्यासारखं आहे हें ! आणि शिवाय अशा कांहीं वस्तू आहेत कीं, मनुष्यानं सैजवलेल्या हंगामी वेळांतच त्यांचा उपभोग घ्यायचा असतो ! यापेक्षां जास्त महत्त्व त्या वस्तूंना देणं हें रूढीला सोडून होणारं आहे. मला तरी बाई असं वाटतं ! " स्वरूपनें उत्तर दिलें.

" निसर्गानं ती वस्तु निर्माण केली ती काय पोरखेळ म्हणून ! निरुपयोगी अडगळ निर्माण करण्यांत काय साधलं त्यानं ? त्या वस्तूवांचून चालण्यासारखं असतं, तर ती जन्मालाच आली नसती. उलट बाजू म्हणून जी सांगितलीत, ती परमेश्वराच्या हेतूचा विपर्यास करणाऱ्या स्वार्थी लोकांची आहे. आपल्याला फार समजतं अशा भावनेनं वागत असतात ते ! निसर्गाच्या उपवनांत दरवळणाऱ्या सगळ्या पुष्पांनीं एकमेकांचा मान राखलाच पाहिजे ! हा विधात्याचा कायदा उधळून देऊन रूढिबंधनांचे कसले गोडवे गातां ! रूढीच्या कायद्यांची आंच लोणीसुद्धां वितळवूं शकणार नाहीं आतां. सजीव आणि निर्जीव अशा अणुरेणूंचीसुद्धां क्रांति होत असते. धुळींतले कणही परिस्थितीच्या रंगानं पालटत असतात, इतकंच काय पण धुराचा एकजुटीनं निघालेला लोटही, कणाकणांनीं विरघळून वाहणाऱ्या वाऱ्यांत विरून जातो; म्हणजे परिस्थितीप्रमाणं बदलत असतो तो ! मग रूढीच्या रंभा-ऊर्वशींना नव्या जमान्याप्रमाणं न नटवणं, हा कुठला मूर्खपणा ! एक काळ लवकरच असा उगवेल कीं, या रूढीच्या सोवळ्या उपासकांना

स्मशानदेखील इतकं बदललेलं दिसेल कीं, त्यांना त्या जागेवर जळण्याचंही समाधान लाभणार नाहीं."

हंसतमुखानें उत्तर देऊन रुचीर गप्प बसला. ही संधि घेऊन प्रगति पुढें झाली आणि स्मितपूर्वक म्हणाली, "अहो रुचीर, म्हटलं घरदार कांहीं आहे कीं नाहीं तुम्हांला!"

"प्रगतिताई," रुचीर उज्ज्वल हास्य करीत म्हणाला, "ज्या दिवशीं आपण जन्माला येतों, त्या दिवशींच परमेश्वराकडून कुठल्या तरी एका कर्तव्याच्या नवख्या वाटेवर आपण फेंकले जातों. म्हणजे आपलं जीवन हें एक वाटसरूचं जीवन आहे. घरदार, प्रपंच हीं सगळीं सोंगं, म्हणजे वाट चालतां चालतांचीं क्षणिक विसांव्याचीं क्षेत्रं. त्यांची निराळी आठवण कशाला पाहिजे? अस्ताव्यस्त स्मारकांप्रमाणं तीं उभींच आहेत रस्ता अडवून!"

"अगदीं हद्द झाली आतां तुमच्यापुढं!" प्रगति मनमुराद हंसत म्हणाली. स्वरूपचीही तीच अवस्था झाली होती. "तुमचा स्वभाव तरी कसला आहे! विनोदी म्हणावं तर गंभीर विषयांचं प्रतिपादन करतां. गंभीर म्हणावं तर हंसऱ्या फुलांचं रान उठवतां. एकलकोंडे म्हणावं तर सगळ्यांशीं समरूप होतां आणि सगळेच तुम्ही आहांत असं म्हणावं, तर सगळ्यांवेगळे वगळून दिसतां! म्हणावं तरी काय तुम्हांला!"

प्रगतीच्या या विवेचनानें स्वरूपही हंसली अन् रुचीरही! तो विनोदानें म्हणाला, "बराच मोठा माणूस आहें मी! स्वभावदिग्दर्शन म्हणून एकादं पुस्तक लिहा ना माझ्यावर!"

"तेंही केलं असतं; पण फार कठिण कला आहे ती." प्रगति म्हणाली.

"त्यांत काय कठिण आहे!" रुचीर म्हणाला, "सुरुवातीला लिहायचं श्रीगणेशाय नमः! आणि शेवटीं म्हणायचं इतिश्री!"

"हीं दोन तोंडं दाबलींत! आणि मध्य!" स्वरूप सहास्य म्हणाली.

"मधल्या भागांत कसलाही कचरा भरा! कोणीही पाहात नाहीं."

हंसतां हंसतां पोट दुखून आलें त्या दोघींचें. आतां अधिक हंसण्याचीही ताकद उरली नव्हती त्यांच्याजवळ. तरी त्यानें कांहीं तरी बोलत असावें,

ही त्यांच्या आशेची तहान कांहीं तृप्त झाली नव्हती; तथापि तोच कंटाळला होता आतां. सहास्य मुद्रेनें प्रणाम करीत तो उठून उभा राहिला.

"वेळेचं भानच राहात नाहीं मला तुमच्याशीं बोलतांना!" जातां जातां तो म्हणाला. त्याच्या जाणाऱ्या पाठमोऱ्या रम्याकृतीकडे त्या किती तरी वेळ पाहात उभ्या होत्या.

---

## प्रकरण १२ वें

# तडजोडीचें पाचारण

रुचीरला आज विश्रांतीचा योग नव्हता. तो येऊन बसतो न बसतो तोंच बाहेर मोटारचें हॉर्न वाजलें. तें हॉर्न राजकुमारीच्या मोटरचें असल्याबद्दल त्यानें ताबडतोब ओळखलें. पुढ्यांत आलेला चहा आतां त्याला एकट्याला घेतां येणें शक्यच नव्हतें. आणखी चहा घेऊन ये म्हणून विठूला आज्ञा देऊन तो तिच्या स्वागतासाठीं दाराकडे निघाला; तोंच त्याला ऐकूं आलें, "ऐकलंत का रुचीर, मीं माझ्या नशिबाची पूजा केली आहे म्हटलं!" राजकुमारीचा गोड आवाज होता तो.

"ऐकण्याची जरूरच कुठें उरली आहे! राजघराण्यांत जन्माला आलेल्या माणसानं नशीब पूजलेलं नाहीं असं कोण म्हणेल! उघडा हिशेब आहे हा." रुचीर तिला नमस्कार करून खुर्ची दाखवीत म्हणाला.

"राजघराण्यांत जन्म!" हवेंत एक दीर्घ निःश्वास ओतून ती म्हणाली, "तापलेल्या तेलाप्रमाणं कानांत शिरतात हे शब्द! कुठल्या पापांची शिदोरी बांधून प्रवास झाला कोण जाणं हा जन्म घेण्यासाठीं!"

"सुखैश्वर्यांत लोळणाऱ्या माणसानं... !" रुचीर कांहीं तरी प्रत्युत्तर करीत असतां त्याला तिनें मधेंच अडवून म्हटलें, "सुख आणि ऐश्वर्य!

सोन्याची बेडी म्हणजे काय स्वरूपाला शोभविणारा दागिना होय ? रुचीर, मला हेवा वाटतो तुमचा ! "

" संभवनीय आहे ! " तो स्थिरपणानें म्हणाला, " पण पाहिजे कशाला तो विषय आतां. पुढ्यांतला चहा संपवूं या आधीं ! "

" अहो, त्यासाठींच तर मीं नशिबाची पूजा केली आहे म्हणून म्हटलं. तुमच्या इथला चहा मिळवण्याइतकी दैवाला दुसरी पर्वणी कुठून लाभणार ! " तरळत्या नजरेनें त्याच्याकडे पाहात ती हंसून म्हणाली.

" कां, माझ्या इथला चहा म्हणजे काय इंद्राघरलं अमृत आहे थोडंच ! " सुंदर हास्य करीत त्यानें विचारलें. या वेळीं त्याचें हास्य इतकें मनोवेधक वाटलें तिला, कीं ती तन्मयच होऊन गेली तिकडे पाहण्यांत. रुचीर म्हणजे सौंदर्यानें सजलेलें सजीव कोडेंच वाटत होतें तिला. त्याच्या प्रत्येक हाल-चालीनें तिला गोड संवेदना होत होत्या. ती प्रत्येक वेळीं स्वतःशीं म्हणत होती, " रुचीर आणखीन् हंसतील तर काय बहार होईल ! " पण नेहमींच अतृप्त असणारी आशा होती ही !

" अमृतालाही लाजवणारं असं प्रेम, अंतःकरण आहे यांत. नाहीं तर आमच्या इथला चहा घ्या; निव्वळ औपचारिक कर्तव्य ! काळ्या कंच खडकांच्या अंतर्यामांत म्हणतात झऱ्यांची ओलवण असते म्हणून; पण मानवी खडक म्हणजे अगदीं ठणठणीत कोरडे. राजेरजवाड्यांचं ऐश्वर्य म्हणजे निष्प्रेम जीवनाचं व्यवस्थित मांडलेलं प्रदर्शन ! थाटमाट आणि रंगरूप यांची भरपूर उधळण पाहून घ्यावी फक्त. "

स्निग्ध हास्य करीत तो तिला म्हणाला, " पण असल्या काळ्या कातळावरही तुमच्यासारख्या मृदु अंतःकरणाच्या वनस्पती उगवतातच कीं नाहीं ! मग झालं तर ! खडकांच्या अंगचा हा गुणही कांहीं कमी प्रतीचा नव्हे. आणखी ओतूं थोडा चहा तुमच्या कपांत ? "

" हं ! ओता थोडा. दुसऱ्यांचे अल्प सद्‌गुणही शिरोभागीं धरतां तुम्ही ! धन्य आहे तुमच्या उदार हृदयाची. "

" धन्यता देण्यासारखं यांत काय आहे ! " मंजुळ स्मित करीत तो म्हणाला, " निर्दोष असं काय आहे जगांत ? पुष्कळसे सद्‌गुण दोषांच्या

वैभवांत लोळत असतात, म्हणून काय ते सद्‌गुण नव्हेत ? चांगल्याचा नम्रता-पूर्वक स्वीकार करावा. वाइटाला नम्रपणें नमस्कार करावा ! निसर्ग दोन्ही वस्तू दुकानांत घेऊन बसलेला आहे. बुद्धीच्या जरूरीप्रमाणं जो तो खरेदी करील. हाच नियम सर्व ठिकाणीं लावायचा."

"मला नाहीं बाई यांत कांहीं समजत ! अन् इतका अवघड विषय रोजच्या हजेरींत नसावाही पण ! होय ना ?"

"फार अवघड विषय असतात रोजच्या अभ्यासांत, पण संवयीमुळं ते बिनबोभाट उरकले जातात."

"तसंही असेल; मग हा कंटाळवाणा विषय स्वतंत्रपणें घेऊन घोकीत बसण्याचं काय कारण ?"

"यावेगळं आणखी कांहीं तरी बोलूं आपण. मग तर झालं !"

"हो गड ! आणखीन् कांहीं तरी वेगळंच बोलण्यासाठीं आलें आहें मी आज; पण आरंभाचे शब्दच कोंडले गेलेत मनांतल्या मनांत ! तुम्हांला बंगल्यावर न्यायला आलें आहें मी !"

"असं होय !" रुचीर तेंच रम्य हास्य करीत म्हणाला. "दोन तीन दिवसांत केव्हां तरी हें बोलावणं येणार, अशी गुणगुण लागलीच होती आम्हांला. अतिशयच तिखट कानाचे बातमीदार आहेत आमच्या-जवळ !"

"सरकारी बातमीदारांचे कानही कांहीं गळून पडलेले नाहींत म्हटलं !" ती म्हणाली. "तुमच्या परवांच्या कार्यकारी मंडळाच्या सभेंत काय ठरलं, तें देखील समजलं आहे आम्हांला ! आणि म्हणून तर मोटर तुमच्या दारापुढं येऊन उभी राहिली. कार्यकारी मंडळांत तुम्हांला तड-जोडीसाठीं एकटे एक प्रतिनिधि निवडल्याचें ऐकून, किती आनंद वाटला आहे म्हणून सांगूं आम्हांला ! तें समजल्यावरच तुम्हांला स्वतः घेऊन जाण्याची परवानगी मिळवली मी !"

हें सांगत असतां तिचा हार्दिक आनंद, तिच्या मुखावरून ओसंडत होता अगदीं !

"नसती जबाबदारी पडली आहे ती माझ्यावर !" तो म्हणाला,

"बहुतेक कार्यकर्ते आणि मुत्सद्दी, दरबारनें निरनिराळ्या कलमांची कात्री चालवून कोंडून टाकल्यामुळेंच ही आपत्ति ओढवली आहे माझ्यावर!"

"जे कोंडले गेलेत, त्यांच्याबद्दल मला कांहींच म्हणायचं नाहीं. ते कोंडले गेले म्हणून, मोकळ्यांना आपली जबाबदारी समजणार नाहीं असं थोडंच आहे! आकाशांत फिरणारी प्रत्येक तारका, त्यांतील शोभेच्या हिशेबांत असते!" तिनें उत्तर केलें.

याच वेळीं प्रजासभेचे कांहीं कार्यकर्ते, रुचीरशीं विचारविनिमय करण्यासाठीं म्हणून आले होते; परंतु, त्यांना रुचीरनें आपण बंगल्यावर वाटाघाटी करण्यासाठीं जात असल्याचें सांगितल्यामुळें ते ताबडतोब निघून गेले. त्यामुळें हे जायला निघण्यापूर्वीच ही बातमी जिकडे तिकडे पसरली.

ते निघून गेल्यावर कुमारी रुचीरला म्हणाली, "सभेच्या वेळीं ठरल्याप्रमाणं जर आजच्या वाटाघाटींत समेट झाला, तर किती चांगलं होईल नाहीं?"

"तसा प्रयत्न तर करूं या. होणं न होणं हें परमेश्वराधीन आहे." तो कपडे घालण्यासाठीं उठून म्हणाला.

"कांहीं नाहीं परमेश्वराधीन!" कुमारी केंसाचे दोन्ही शेपटे दोन्ही खांद्यांवरून पुढें घेत मानेला हिसडा देऊन म्हणाली, "स्वतः चिंध्या करून परमेश्वराच्या पुढ्यांत फेंकण्यांत काय अर्थ आहे! 'वैर हाच जन्माचा हेतु' असं समजून वागणाऱ्या माणसांपुढं, परमेश्वराच्या मर्जीची खिरापत करून वाटली तरी काय होणार आहे! आपण रागावणार नसाल तर एक विनंति करणार आहें तुम्हांला! नाहीं तर म्हणाल, कीं, राजकुमारी म्हणजे एक गोड अशी विध्वंसक शक्तीच वापरली आहे दरबारतर्फे तुम्हांला कर्तव्य-पराङ्मुख बनवायला!"

"छे छे!" रुचीर गंभीरपणें उद्‌गारला, "तुमच्या मनमोकळ्या मनोवृत्तींचा अपमान करायला मी स्वप्नांतसुद्धां धजावणार नाहीं. बिन-हरकत बोला. जनतेच्या स्वाभिमानाला धक्का न देतां जें कांहीं करायला सांगाल, तें जरूर करीन. मी आज्ञा म्हणून मानीन तुमचे शब्द!"

" भारीच मोलानं मोजतां मला ! मला नाहीं वाटत माझी इतकी योग्यता असेल म्हणून ! " ती सौजन्यानें म्हणाली.

तिच्या सौजन्याची पूर्ण कल्पना असल्यामुळें मोहक हास्य करून तो तिला म्हणाला, " हिमालयाला स्वतःची उंची कुठें माहीत आहे ! दुसऱ्यानं मोजून मांडायची असते जगासमोर ! "

मनःपूर्वक हंसली ती आतां आणि गुडघ्यावर कोपर टेंकून तळहातावर हनवटी घेत म्हणाली, " म्हणजे उंच कोण ? हिमालय कीं त्याची उंची काढणारा ! "

" हा तत्त्वाचा प्रश्न आहे. तो सोडवण्याइतका बेकार वेळ आहे कुठें आपल्याजवळ ! "

" अग बाई ! खरंच कीं ! बोलण्याच्या नादांत लक्षच नाहीं गेलं तिकडं. आटोपलं का तुमचं ? मग निघूं याच आतां ! "

" हो; पण तुम्ही कांहीं तरी सांगणार होतां ना ? "

" विशेष कांहीं सांगायचं आहे असं नाहीं; पण मला जें वाटतं तें सांगतें. क्षुल्लक कारणावरून समेट उधळूं नका. शक्य तोंवर जुळतं घ्या. एवढंच मला विनवून सांगायचं आहे आपल्याला. "

" तुमचा सद्धेतु माझ्या लक्षांत आला. हरकत नाहीं ! मी अखेरचा नकार अगर होकार देण्यापूर्वी तुमचें मनोगत समजून घेईन. वचन देतों मी तुम्हांला. मग तर झालं ! "

" ठीक. चला तर मग. "

---

## प्रकरण १३ वें

# तडजोडीचें तारूं तडकलें

राजवाड्यांतील एका भव्य दालनांत बैठकीची व्यवस्था केली होती. एका भव्य अशा गोल मेजाभोंवतीं चार खुर्च्या मांडल्या असून, जवळच थोडें अंतर राखून एक चौकोनी टेबल, त्यावर बऱ्याचशा कागदपत्रांच्या फायली मांडून ठेवलेलें होतें. दोन साध्याशा खुर्च्या तिथेंही पण दिसत होत्या. बंगल्यावरचा पहारा कडक करण्यांत आला होता. इतरांना पूर्ण मज्जाव होता आज आंत जाण्याचा. बंगल्याबाहेरचें आवार प्रचंड जनसमुदायानें झांकून टाकलें होतें. हंसरी फुलेरी गांभीर्यानें विनम्र झाल्याचा तो एक अभूत देखावा होता. कांहीं प्रेमकलहानें संतापलेली स्त्री अंगावरलीं आभरणें उतरून ठेवून ज्याप्रमाणें कळाहीन बसून राहाते, त्याप्रमाणें रुसलेली ही जनतारूपी सौभाग्यश्री निर्णयाच्या शंकाकुशंकांनीं सुकल्यासारखी दिसत होती! त्यांची आतुरता, वाटाघाटीचा निष्कर्ष प्रश्नोत्तररूपानें, एकमेकांतून शोधीत बसली होती. इतक्यांत रुचीरची मोटर येऊन थडकली. जयघोषनिनादानें क्षणभर दशदिशा कोंडून गेल्या. अपूर्व उत्साहानें रुचीरला अभिवादन होतें तें! थोडा वेळ मोटारींतून खालीं उतरून त्यानें सर्वांना नम्र प्रणाम केला. सर्वांना शांत राहण्याचा उपदेश करून तो राजकुमारीसह बंगल्याच्या आवारांत शिरला. संस्थानचे दिवाण, युवराज आणि दोन चिटणीशीकडील कारकून, यांनीं त्याचें स्वागत करून त्याला बैठकीकडे नेलें. त्यांना तेथेंच सोडून राजकुमारी स्वतःच्या खोलीकडे निघून गेली.

युवराज आणि रुचीर हे कडेकडेच्या खुर्चीवर बसले. एका खुर्चीवर दिवाणसाहेब बसले आणि अल्पावधींतच राहिलेली खुर्ची राजेसाहेबांनीं येऊन विभूषित केली. हुकुमानें वागणाऱ्या यंत्राप्रमाणें ते दोन कारकून त्या दुसऱ्या टेबलाजवळ जाऊन बसले.

औपचारिक प्रश्नोत्तरविधि संपतांच रुचीरनें त्याला ज्या सभेंत वाटाघाटी करून तडजोडीचा अधिकार देण्यांत आला, त्याच सभेनें तयार

केलेला जनतेच्या मागण्यांचा मसुदा सादर केला. समेटाचें वातावरण निर्माण व्हावें आणि प्रजेच्या आकांक्षा फलद्रूप व्हाव्यात, या हेतूनें त्यानें पुढील देणग्यांची घोषणा ताबडतोब होणें कसें जरूर आहे, हें विशद करून सांगितलें.

१. सर्व राजकीय कैदी ताबडतोब बंधमुक्त करण्यांत येऊन त्यांचे दंड त्यांना परत करण्यांत यावेत.

२. दंडाप्रीत्यर्थ जप्त झालेल्या मिळकती खुल्या करण्यांत येऊन, लिलांव झालेल्या मिळकती परत मिळवून देण्याची सरकारनें तजवीज करावी.

३. राजकीय कैदी म्हणजे प्रजासभेचे कार्यकर्ते व तत्सम दुसरे कार्यकर्ते समजण्यांत यावेत.

४. संस्थानची राज्यघटना ठरविण्यासाठीं प्रजासभेचे पांच, सरकारी दोन व इतर दोन अशा लोकांची कमिटी नेमण्यांत यावी.

५. वरील कमिटीचा रिपोर्ट आधारभूत धरून राज्यघटना जाहीर करण्यांत यावी.

मसुद्यांतील १, ४ व ५ या कलमांना मान्यता बिनहरकत तर नाहींच; परंतु थोड्याशा नाखुषीनें मिळाली. तथापि २ व ३ कलमांना मान्यता मिळण्याचा रंग दिसेना. एका तसूचाही कमीपणा घ्यायला सरकारपक्ष तयार नव्हता. हीं दोन्ही कलमें म्हणजे प्रजासभेच्या आजवरच्या कष्टी आणि रखरखीत जीवनावर तुषारवृष्टीप्रमाणें असल्यामुळें, रुचीरलाही त्यांत अंशाचीसुद्धां मोडतोड करतां येणें शक्य नव्हतें. अखेर दिवाणांच्या मध्यस्थीनें दुसऱ्या कलमाचा कांहीं भाग उभयपक्षीं मान्य करण्यांत आला. परंतु तिसरें कलम मात्र उभयतांनाही समाधानाची वाट दाखवीना. दरबारचें म्हणणें असें पडलें कीं, ज्यांना राजद्रोहाच्या कलमान्वयेंच शिक्षा झालेल्या असतील, अशांनाच राजकीय कैदी समजण्यांत यावें; मग ते कोणीही असोत. पण ही गोष्ट रुचीरनें अमान्य केली. त्याचें म्हणणें असें कीं, दरबारनें निवळ आकसानें कुठल्या तरी घाणेरड्या कलमांखालीं, खोटेनाटे खटले भरून प्रजासभेच्या कार्यकर्त्यांना शिक्षा दिलेल्या आहेत. तेव्हां या तडजोडींतून त्यांना वगळतां येणार नाहीं.

अखेर राजेसाहेब चिडून म्हणाले कीं, " झाली हीच तडजोड निर्णायक.

समजून चालायला आम्ही तयार आहोंत. यापरतें एका शब्दाचेंही ओझें या तडजोडीला आतां सहन होणार नाहीं. ही अखेरची संधि जर प्रजेनें दवडली, तर संस्थानच्या इभ्रतीसाठीं, संस्थान सर्व शक्य उपायांचा अवलंब करूं शकेल ! ''

" माझं निर्णायक मत देण्यापूर्वी, एक दहा मिनिटें मला राजकुमारीची मुलाखत घेतां आली, तर बरं होईल ! '' रुचीरनें विनंति केली आणि ती मान्य करण्यांत आली.

रुचीर आणि राजकुमारी यांच्या मुलाखतीच्या अवसरांत सगळ्यांना उपाहार मिळाला. रुचीरलाही राजकुमारीसमवेत अल्पाहार घेतां आला. राजकुमारीची मुलाखत संपवून परत येत असतां त्याच्या मुखावरलें हंसें गंभीर झाल्यासारखें दिसत होतें आणि तेवढ्यावरूनच त्याचा निर्णय समजून येत होता. गंभीरपणानें त्यानें तो विदित करून, राजेसाहेबांना फेरविचाराची विनंति केली. कसल्याही परिस्थितीनं एकमेकांचे व्यक्तिशः संबंध सलोख्याचे राखण्याची एकमेकांची विनंति मान्य होऊन आणि फिसकटलेल्या मुद्यांवर विचार करण्यासाठीं दोनही पक्षांनीं चार दिवसांचा अवधि ठेवून बैठक संपविली. राजकुमारीनें त्याला परत पोंचवण्याची आपली आवडती कामगिरी पार पाडली. या घटकेपुरतें म्हणायचें तर तडजोडीचें तारूं तडकलेंच होतें.

---

## प्रकरण १४ वें

# हृदयाविष्करण

जगतीच्या मनोभूमींत आपल्या चिरंतन स्मृतीचें बीज पेरून वसंत निघून गेला होता. प्रगतीही जाणार होती. परंतु चळवळीची वावटळ उठल्यामुळें स्वरूप कोणत्या प्रकारची हालचाल उठवते, हें पाहण्यासाठीं तिला साहजिकच कांहीं काळ थांबावें लागलें. समेट फिसकटला होता. प्रजेनें अपूर्व उत्साहानें लढा सुरू करायचें ठरवलें होतें. स्वयंसेवक आणि स्वयंसेविका यांची धडाक्यानें नोंद होत होती; परंतु कुठलीही परिस्थिति एकतर्फी असत नाहीं. प्रजेला विरोध करणारे कांहीं तोंडपुजे दादा आणि दाजी असायचेच. आपल्या तुटपुंज्या स्वार्थासाठीं असंख्य लोकांचें नुकसान करण्याचा प्रयत्न करायला सदा सिद्ध असतात हे लोक. तीच प्रथा मणिभूषणानें पुढें चालवली होती. त्यांची राजनिष्ठा आषाढी-पुराप्रमाणें दुथडी वाहावयाला लागली होती. उघड उघड रुचीरविरुद्ध प्रचार सुरू केला होता त्यानें. रुचीरला कारागृहांत ढकलल्यानें आपली वाट मोकळी होईल, अशाच भावनेनें त्याची ही सगळी धडपड होती. रुचीरच्या शत्रुविहीन भावना मात्र या भानगडीला पारख्या होत्या.

सत्याग्रहाच्या प्रचारासाठीं बाहेरगांवी जायचें होतें त्याला. तेव्हां जाण्यापूर्वी आपल्या आशा स्वरूपजवळ व्यक्त करून, तिचें मनोगत समजून घ्यावें असें त्यानें ठरवलें होतें. त्याच्या जीविताची एकच एक आशा, आज त्यानें पणाला टाकली होती. अंधार कीं उजेड! असें म्हणतच त्याच्या आशांनीं स्वरूपच्या बंगल्यांत पाऊल टाकलें होतें.

वारादेखील परिस्थितीशीं समरस होऊन बदलत्या परिस्थितीनें वाहात होता. अवघें वातावरण स्वाभिमानाच्या गंभीर उत्तेजनानें धांवत होतें आणि सर्व दिशादिशांतून विचार सुरू झाला होता. याच वेळीं स्वतःच्या दिवाणखान्यांत स्वरूप सर्व परिस्थितीचा गंभीरपणें विचार करीत बसली होती. तिचें सगळें मन विचारांत विरून गेलें होतें; त्यामुळें रुचीर केव्हां

येऊन बसला तेंही तिला समजलें नाहीं. येणारें संकट हें अपेक्षेबाहेरचें असतच नाहीं आणि म्हणून त्याचे परिणाम, जसे असतील तसे भोगायला प्रत्येकानें आपलें मन तत्पर केलें पाहिजे. ही रुचीरची विचारप्रणाली असल्यामुळें, परिस्थितीप्रमाणें त्याच्या भावना हादरत नसत. आजही त्याचें हंसरें कमल भावनांच्या लाटांवर नेहमींच्याच विनोदी वृत्तीनें डोलत होतें! निर्व्याज हास्य उधळीत तो म्हणाला, "सर्व जगावर काळ्या मेघांनीं काळोखाचं आंवरण घालून, उभी वाट झांकून टाकली असतां, विजेनं विचार करीत राहावं, हें केवढं आश्चर्य आहे! चमकून वाट दाखवण्याचं नैसर्गिक कार्य सोडण्याइतका हा नसता हताशपणा, आपल्याला नाहीं पसंत!"

"कोण रुचीर!" दचकून मागें पाहात तिनें विचारलें, "बस ना! उभे कां! विजेची उपमा वाहून माझ्यावर चंचलपणाचा आरोप केलांत हं जातां जातां!" मान तिरपी वळवून वांकड्या दृष्टीनें त्याच्याकडे पाहात ती हंसून म्हणाली.

"मग त्यांत काय वावगं वाटलं तुम्हांला? मनुष्यप्राणी आपल्या स्वभावाची आवड फुलांच्या जातींत शोधून, नेमकं तेंच फूल आपल्या देवाला आवडतं म्हणून वाहात असतो! भक्ताच्या भावनेचा गौरव करायला देव बांधील असतो! असाच याचा अर्थ आहे नव्हे का?"

"रुचीर, नांवाप्रमाणेंच तुमचे विचार! त्यांच्या मधुर सुवासानं जीव कसा सुन्न झाला आहे! काय उत्तर देऊं मी! रुचिरांची गौरवदेवता म्हणवून घेण्याचं भाग्य, माझ्या आधाशी वृत्तींनादेखील पचणार नाहीं. मोहाची मोगरी फुलवून मला खेंचून घेण्याचा हा तुमचा प्रयत्न तुमच्या अधःपाताला कारण होईल! तुमचें कुल, शील, कीर्ति आणि तेजस्विता, यांना हें ग्रहण कशाला लावून घेतां! माझा इतिहास.... !" अतिशय सौम्य शब्दांत तिनें त्याला परावृत्त करण्याचा प्रयत्न केला; पण तो तिलाच साधला नाहीं. एकादी गोष्ट पाहिजे असतांना ती नको म्हणून सांगायला किती कठिण असते, याची जाणीव ज्यानें अनुभव घेतला असेल, त्यालाच असूं शकेल. स्वतःच्या जिवंत भावना अशा तऱ्हेनें मनांतल्या मनांत जाळून टाकण्याचा प्रयत्न करणें, हें अतिशय कठिण दिव्य आहे आणि तें दिव्य प्रेमच करूं शकेल! परंतु

प्रीतीची फुलवेल कोमेजूं द्यायला रुचीर तयार नव्हता. तो म्हणाला, “तो इतिहास मीं वाचला आहे...नव्हे त्याचा अभ्यास ...पाठांतर केलं आहे! गुलाब-मोगरीच्या बागेंत फिरणाऱ्या माणसानं, वेली, फूलं आणि सुगंध, यांच्याकडं पाहायचं सोडून त्यांच्या जन्मजागेकडे कां पाहावं! घटकाभर जगाच्या दृष्टीनं पाहायचं म्हटलं, तरीसुद्धां माझंच म्हणणं बरोबर ठरतं. अस्वच्छ जागा स्वच्छ करायची कीं अस्वच्छतेंत भर घालायची! कारणं कोणतींही आणि कसलींही असोत, त्यामुळें एकादी इमारत पडून तींत जर आसपासच्या भुरट्यांनीं कचरा टाकायला सुरुवात केली, तर ती जागा कचऱ्याची जागा म्हणून कायम ठेवण्याचा हट्ट धरणं, हें काय रीतीला धरून होईल! दुसऱ्या दृष्टीनं पाहिलं तरी काय दिसेल! मातीच्या खाणींत हिरा सांपडला, तर तो काय फेंकून द्यावा!”

स्वरूप कांहीं एक न बोलतां पायाच्या अंगठ्यानं फरशी खरवडीत खालीं पाहात होती. पदराच्या टोंकाला पीळ भरून पुन्हां सोडून देण्याचा चाळाही चालू होता हातानें. मधून मधून हळूच नजर वर उचलून रुचीरच्या मुखकमलावर स्थिर केली जात होती. एकंदरींत तिच्या सगळ्या भावना अस्थिर होऊन आडव्यातिडव्या धांवत सुटल्या होत्या.

आज रुचीर काय म्हणायला आला आहे, हें स्पष्ट झालें होतें. तसें म्हणायचें तर प्रत्यक्ष बोलण्यापेक्षां, त्यानें वेळोवेळीं स्वतःचे विचार प्रदर्शित करतांनाच, या परिस्थितीचें सूतोवाच करून ठेवलें होतें; परंतु इतक्या दिवसांच्या विचारानें देखील तिचें उत्तर कायम झालें नव्हतें. रुचीरचें प्रापंचिक सहकार्य हेंच तिच्या जीवनाचें ध्येय होतें! स्वतःचें परीक्षण करतांना ती स्वतःशींच म्हणत असे कीं, “रुचिरांच्या योग्यतेला माझ्यामुळें कसलेंच गालबोट लागणार नाहीं. मी खात्रीनें अनुरूप आहें त्यांना!” पण हे मनोगत विचार स्पष्ट बोलण्याचें धाडस करीत नव्हते. रूढीच्या सावलीला बिचकत होते ते. स्वरूप कांहीं तरी बोलेल, तिनें कांहीं तरी बोलावें, या अपेक्षेनें रुचीर बराच वेळ थांबून तिच्याकडे पाहात होता. शेवटीं ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून तो म्हणाला, “मी मुद्दामच आलों आहें आज. उद्यां मुंबाला जाणार आहें. फिरून चार दिवसांत येईल कीं चार वर्षांनीं येईन

त्याची शाश्वति नाहीं. कदाचित् प्रचारकार्याच्या दौऱ्यावर असतांनाही अटक होईल मला. तसं झालं तर आपल्या फिरून गांठीभेटी लवकर होणार नाहींत. तुरुंगाच्या दारांत उभें राहून बाहेरच्या आशांचा निरोप घेणं, हें कमकुवत मनाचं लक्षण समजलं जात असेल कदाचित्; पण त्याला नाइलाज आहे. सुटल्याबरोबर कुठल्या आशेकडे धांवत जाऊन आपल्याला समाधान घेतां येईल, कुठल्या हृदयाचे धागेदोरे आपल्याबद्दलच्या काळजीनं पिंजून निघत असतील, कुठले डोळे आपल्या भेटीसाठीं आतुर असतील आणि कुणा-साठीं हें धडधाकट आयुष्य घेऊन बाहेर यायचं ! सक्तमजुरीच्या यातनांपेक्षां याच विचारांच्या यातना फार जाणवतात आंत ! देशासाठीं देहाचं दान करतांनाही असल्याच विचारांची खिन्नता माणसाला रंजीस करीत असते ! आयुष्याला कांहीं तरी माधुरी पाहिजे......म्हणजे त्या समाधानाच्या तंतूंवर नाचणाऱ्या जिवाला ......कसल्याही संकटांत यातना होत नाहींत. मी त्या माधुरीचा याचक म्हणून आज इथें आलों आहें."

तरीही स्वरूपची मूकवृत्ति कायमच होती. त्याचें अधीर मन तिच्या शब्दासाठीं तृषार्त झालें होतें. अबोल परिस्थितीला कंटाळून तो उतावळे-पणानें परत बोलूं लागला, "माझ्या सगळ्या आशा तुझ्या ठिकाणीं एकत्र झाल्या आहेत. कसल्याही संकटानं माझ्या मनावर परिणाम होत नाहीं, पण तो आतां तुझ्या उत्तरानं होणार आहे. माझ्या या अनपेक्षित प्रश्नानं जर तुझ्या भावना दुखावल्या जात नसतील, तरच मला उत्तर पाहिजे आहे. सांग, आयुष्याचा सहकारी, सेवक, भक्त किंवा जोडीदार म्हणून माझा स्वीकार करशील का ? आपल्या शिक्षणाकडे पाहिलं, तर माझ्या अशिक्षित हृदयाची पायरी फार खालची आहे; परंतु अशिक्षित हृदयाचा सेवक भक्तीच्या जोरावर पायापर्यंत येऊं शकतो ! "

आतां मात्र तिला हृदय बांधून मारतां येईना. तिच्या भावना उचं-बळून आल्या. ती त्याला थांबवून कांतर आवाजांत म्हणाली, "हं ! असलं भलतंच कांहीं तरी नका बोलूं ! मी बोलूं देणार नाहीं असं वेडंवाकडं ! सांगा, मीं कोणतं उत्तर दिल्यानं समाधान होईल आपलं ! "

"ज्या उत्तरानं तुझं स्वतःचं समाधान होईल, त्याच उत्तरानं माझं

समाधान होईल ! माझ्या एकट्याच्या समाधानासाठीं तुझ्या भावना चुरगळून जाव्यात, असं मला स्वप्नसुद्धां पडणार नाहीं कधीं. दोन हृदयांची गांठ जर समाधानानं दिली गेली, तरच तो प्रपंच आणि आयुष्य सुखाचं होईल. कसलींही कडवट दुःखं, अभिन्न हृदयांच्या वैभवांत दरिद्री होऊन पडतील ! " भावनावश होऊन बोलत होता तो. आशेचे तरंगपदर आयुष्याच्या गोफासाठीं गोळा करीत होता तो. त्याचें मधुर हास्य निराशेला मार देत होतें !

इतका वेळ परिस्थितीच्या चिंतनांत गढून गेलेली स्वरूप कसल्या तरी मधुर जादूनं जागी झाली एकदम. अस्फुट हास्य वितरीत ती म्हणाली, " भावनांच्या बंधनांत स्वतःचं अस्तित्व गुंफून टाकूं नका. कांहीं झालं तरी लौकिक दृष्टीचाही विचार करायला हवा ! "

" अविचारच करीत नाहीं; मग निराळा विचार करण्याचं काय कारण ! लोकांच्या दृष्टीनं माझं समाधान थोडंच सांपडणार आहे. ज्याचं हरवतं तोच शोधीत असतो. इतरांना काय जड जातं आहे रिकामं निरूपण करायला ! "

" याच बंगल्यांत समाधान सांपडलं होय तुमचं ! " लाजऱ्या अभिनयानें तिनें विचारलें, " हरवलेल्या समाधानाचा शोध आणखीन् ठिकाणी नाहीं वाटतं लागण्यासारखा ! " या वेळीं अप्रतिम आकर्षकपणा तिच्या चर्येवर मांडलेला दिसत होता. कुठें बाहेर गेलेली प्रगति आतां परत आली होती; परंतु आंत न येतां ती परस्पर दुसरीकडे गेली. आंत येत असतां कांहीं ओझरते शब्द कानावर पडले होते तिच्या. त्यामुळें चालू विषयाचें ज्ञान होऊन ती हंसतमुखानें परत फिरली होती.

" काय अर्थ आहे या विचारण्यांत ! " तो म्हणाला, " माझं समाधानच अजून हरवलं नाहीं तर शोधण्याचा प्रसंग कुठून येणार ! आणि माझ्या दुर्दैवानं जर तें हरवण्याचा प्रसंग आतां उद्भवला, तर मृत्यूच्या मांडीवर डोकं ठेवीपर्यंतही तें फिरून सांपडणार नाहीं ! "

" कसलं हें अभद्र बोलणं ! " भयानें विव्हल होऊन ती म्हणाली, " असं कांहीं तरी बोलूं नये गडे ! फार यातना होतात मला अशानं ! पण मला सांगा, आपल्या लग्नाला संमति देतील तुमचे वडील—मातुश्री ? "

" कदाचित् देतील, कदाचित् नाहीं देणार." रुचीर आशामय गांभीर्यानें म्हणाला, " म्हणून तेवढ्यासाठीं मी माझ्या माणुसकीच्या भावनांना निखाऱ्यावर निजवूं कीं काय ? "

" कांहीं तरीच काय बोलावं उगीच ! मला नाहीं आवडणार असलं कांहीं ! " ती मृदुपणानें म्हणाली, " ही स्पर्धा झाली. स्पर्धेच्या वातावरणांत उभ्या केलेल्या संसाराला आणि सुखाला कसली तरी टोंचणी लागत असते सारखी ! " आपण कीं नाही, आपल्या त्यागानंच त्यांची संमति मिळवूं या म्हणजे झालं ! निराळ्या हातानं परंतु अशी स्पष्ट कबुली देतांना स्वरूप लाजली आणि तें चोरटें रहस्य गालांवर झणकन् सळसळून गेलें ! तिची चोरमुख दृष्टि रुचीरकडे खिळली होती. समाधानाच्या गुंगींत रुचीर सुखाचे बिंदू वेंचीत होता. आजचें समाधान सांठवायला त्याला त्याचें हृदय अपुरें वाटलें ! प्रेमालिंगनानें ती तहान भागली असती कदाचित् कांहींशी; परंतु तो सरळ वाटेनें चालणारा प्रेमपथिक होता. भावनांचें उच्छृंखल प्रदर्शन म्हणजे प्रेम नव्हे, हें त्याला चांगलें माहीत होतें. स्वच्छ आरसा तोंडाच्या फुंकरीनेंही मलीन होऊं नये, या भावनेचा तो मनुष्य होता. संयमन हें त्याचें तेज, उज्ज्वल नीतिमत्ता हें त्याचें स्वरूप आणि स्वाभिमान व कर्तव्य हें त्याचें आयुष्य होतें. उथळ वृत्तींचा खळखळाट हें कांहीं प्रेमनिदर्शनाचें चिन्ह नव्हे; आणि ही गोष्ट तो जाणून होता. तो रम्य स्मित करीत म्हणाला, " कबूल आहे मला. दुसऱ्याचं हृदय जिंकायला, त्यागासारखी अमोघ शक्ति नाहीं दुसरी. त्याग निसर्गतःच विजयी असतो ! फारच सुंदर मार्ग काढलास शोधून; पण त्यामुळं आपल्यांतलं अंतर निघेल का भरून ! आपण अजूनही कांहीं अंतरावरून एकमेकांचे राहणार ! किती उदास विजय आहे हा त्यागाचा ! "

" प्रत्यक्षापेक्षां अप्रत्यक्ष सहवासांत केवढी जादू असते, कल्पना आहे आपल्याला ? अदृश्य कोनाकोंपऱ्यांतूनही आपल्या अभिन्नत्वाचे पडसाद उमटतील ! डोळे मिटून पहा, मधीं मोकळी जागाच उरली नाहीं मुळीं ! "

" स्वरूप, मी प्रत्यक्षाचा भुकेला आहें. अप्रत्यक्ष माझी भूक कशी भागवणार ? तरी त्यागाला तयार आहे माझें मन ! मी साधा माणूस

आहें. तुझ्या शब्दाखेरीज दुसऱ्या कोणत्याच परिस्थितीवर विश्वास नाहीं माझा ! उभ्या आयुष्याची सवलत तुझ्या शब्दासाठीं खर्ची घालीन मी ! "

"इश्श ! भलती भलतीच शिदोरी सुटायला लागली आतां तुमची !" ती हास्यगंध पसरवीत म्हणाली, "कर्तबगार माणसानं कर्तव्याची जाणीव टाकून, उगीच आडवाटेनं धांवून दमावं ?"

तो मधुर हास्य करीत म्हणाला, "कर्तव्याच्या वाटेनं धांवतांना आतां मला दम लागणार नाहीं. माझ्या देवतेची स्मृति... !"

"मी बोलणार नाहीं हं अशानं !" ती उसना राग गोळा करीत म्हणाली, "एकाद्या माणसाला उगीच लाजवायचं आपलं ! एका मुलीच्या अनुमतीवर आयुष्य अवलंबून ठेवणाऱ्या एका माणसाचा कळला पुरुषार्थ !"

कांहींच उत्तर न देतां, रुचीर समोरच्या आरशाकडे पाहात बसला नुसता. या वेळीं त्याच्या मुखावर हृदयंगम स्मित झळकत होतें. स्वरूपनेंही तिकडे पाहून तोच प्रयोग केला. ती सुंदरशी लाजली अन् रुचीर खूप मोठ्यानें हंसला. प्रगति चहा घेऊन आंत येतांना म्हणाली, "तुम्ही दोघांनींही माझे आभार मानायला पाहिजेत आतां !" आणि ती स्वरूपकडे तिरव्या नजरेनें पाहून मनमोकळेपणानें हंसली. तें हास्य म्हणजे अभिनंदनच होतें त्या दोघांचें.

"इश्श !" स्वरूप उद्गारली. लज्जेच्या लोभनीय छटा पसरल्या होत्या तिच्या चेहऱ्यावर; तिकडे पाहात रुचीर म्हणाला, "आयुष्याच्या या लाजऱ्या स्मृति, प्रापंचिक दुःखांत कुठें विसांव्याच्या स्थानाप्रमाणें होतात !"

आतां त्या दोघीही लाजल्या. आणखीन् थोडचा वेळानें, गोड संवेदनांच्या उन्मादक अवस्थेंत त्यांनीं एकमेकांचा निरोप घेतला.

---

## प्रकरण १५ वें

# फांसा चुकला

सकाळचें सौंदर्य हें रोजच्या कार्यक्रमांत ताजें असतें! आणि म्हणूनच तें उपभोगविरहित कलिकेप्रमाणें सदा प्रसन्न असें वाटतें! निसर्गाच्या प्रक्षोभानें, वर्षांतल्या कांहीं सकाळी जरी दुर्मुखलेल्या अगर पडलेल्या प्रसन्नतेच्या दिसत असल्या, तरी बारीक दृष्टीनें पाहणाराला त्यांतूनही तिच्या चिरंतन सौंदर्याचें सत्य, एकवटून गुंफलेलें पाहायला सांपडतें. त्यांतल्या त्यांत कोवळ्या पालवीनें तरंग झुळका घेत उगवणारी चैत्रांतली एकादी सकाळ म्हणजे तर पाहायलाच नको! अवघी खिन्नता मलिन होऊन कुठें निर्माल्यांत पडलेली असते, तें समजतसुद्धां नाहीं.

अशाच एका रम्य सकाळीं मणिभूषण आणि बाबासाहेब म्हणजे रुचीरचे वडील हे तेथील राणिबागेंत एका कुंजासन्निध कोंचावर येऊन गप्पा मारीत बसले होते. पाठीमागच्या बाजूलाच कुंजाच्या आडोशानें राजकुमारी हिरवळीवर पुस्तक वाचीत बसली होती. तिच्या जवळच तिची सहचरी विनयानें बसून, कसल्या तरी कल्पनाचित्रांत तल्लीन झाली होती. अर्थात् त्या दोघींना यांच्या अस्तित्वाची अगर यांना त्यांच्या उपस्थत्वाची कांहींच जाणीव नव्हती.

बाबासाहेब काल परवांलाच एकाएकीं येऊन आपल्या धनाढ्य दोस्ताकडे म्हणजे मणिभूषणकडे उतरले होते. त्यांचें आगमन रुचीरला अज्ञातच होतें अजून; आणि आतां तर तो धामधुमींत असून परगांवीं गेलेला असल्यामुळें तें त्यांच्या उद्देशाच्या पथ्यावरच पडलें होतें. ते मागेंच आले असते, परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें इतके दिवस मधें निघून गेले. रुचीरच्या दुखण्याचें समजल्यावरही त्यांना स्वतःला येणें अशक्य झालें होतें. आनंदीबाईंनाही त्यांनीं हेतुपुरस्सर येऊं दिलें नव्हतें; आणि वसंताला तर त्यांनीं कांहींच कळूं दिलें नव्हतें. पण या अति बंदोबस्ताचा कांहींच उपयोग नव्हता.

आपल्याला आलेलें निनांवी पत्र मणिभूषणानेंच पाठविलें असेल

अशी त्यांची कल्पनाच नव्हती. त्यांनीं त्याच्याजवळ आपलें हितगुज सांगितलें; आणि त्यानेंही अगदीं तिऱ्हाइताचा आव आणून त्यांच्या असंतोषांत भर घालण्याचा क्रम सुरू ठेवला. आतांही त्यानें तेंच आख्यान सुरू केलें होतें.

यांच्या बोलण्यांत वारंवार रुचीर, स्वरूप आणि प्रगति यांचीं नांवें गोंवलीं जात होतीं. तें ऐकून राजकुमारीला आश्चर्य वाटलें. ती अधिक एकाग्रपणानें त्यांचा संवाद ऐकूं लागली. एकंदर भाषणाच्या ओघावरून राजकुमारी एवढें समजून चुकली कीं, ते दुसरे गृहस्थ म्हणजे रुचीरचे वडिलच होत. त्यांच्याजवळ रुचीरची नसती नालस्ती करीत असलेल्या मणिभूषणाचा, तिला अगदीं संताप आला होता. रुचीरसारख्या शत्रुविहीन हृदयाच्या माणसाशीं त्यानें शत्रुत्व कां बांधावें, हेंच तिला समजेना. ती निंदा तिला असह्य वाटू लागली. मणिभूषण म्हणत होता, "गणिकेच्या कुलांत नीतिमत्ता नांदेल, हें स्वप्नसुद्धां पडणं कठिण आहे, मग प्रत्यक्ष परिस्थितीची गोष्ट कशाला ! असल्या कुलहीन पोरींच्या नादीं लागून, रुचीरनं स्वत:च्या शीलाला नसता कलंक लावून घेतला आहे. आणि ही गोष्ट कुळाच्या इभ्रतीला धोका देणारी आहे, हें त्याला समजायला पाहिजे होतं ! बरोबर आहे ना मी म्हणतों तें ?" त्यानें बाबासाहेबांना प्रश्न करून, त्यांच्या शांत मनोवृत्तींना चिमटा घेण्याचा प्रयत्न केला. स्पर्धेच्या हृदयांत केवढा द्वेष भरून राहिलेला असतो, याचें उदाहरण आहे हें.

इतका वेळ संतापानें फणफणत असलेली राजकुमारी आतां उठून तिथें आली; आणि मागल्या बाजूनें दोघांच्या मध्यें मोकळ्या असलेल्या कोंचाच्या कडेवर, एक पाय देऊन, त्याच्यावर कोपर ठेवून, त्याच्या मदतीनें हनुवटीला तळहाताचें टेंकण देत ती म्हणाली, "तुमचा मूर्खपणा तेवढा बरोबर आहे, बाकी कांहीं देखील बरोबर नाहीं !" अति कोपानें तिची तनुलता थरथर कापत होती नुसती. "रुचीरसारख्या देवतोपम माणसाची निंदा करणारी तुमची जीभ, सराटयांत लोळण घेत असते वाटतं रोज ! श्रीमंतीच्या उनाडपणाला शोभेसा धंदा आहे खरा हा !" कुत्सितपणानें हंसण्याचा प्रयत्न करीत ती म्हणाली. तिच्या संतापलेल्या हृदयाचे कढत कढत नि:श्वास

सारखे बाहेर फेंकले जात होते आणि त्यामुळें तिच्या छातीचा भाग सारखा खालीं–वर होत होता.

या आकस्मिक कडकडाटानें हतप्रभ झालेले बाबासाहेब, पाहातच राहिले तिच्याकडे. रुचीरच्या प्रेमानें पोसलेल्या त्यांच्या सुप्त भावना, जणू काय हलवूनच जाग्या केल्या तिनें! त्यांच्या रुचीरविरोधी एकांगी विचारांना कसला तरी शह बसला एकदम! ते लक्षपूर्वक ऐकूं लागले पुढें.

"कोण, राजकुमारी!" हंसण्याचा वृथा प्रयत्न मांडीत मणिभूषण म्हणाले. परंतु त्यांचें तें मघाचें बेमुर्वत अवसान आतां काळवंडलें होतें! त्यांतून दुष्ट माणसाचा भेंकडपणा उगवला होता आतां. कांहीं तरी बोलायचें म्हणून ते म्हणाले, "माझ्या वयाकडं पाहून तरी शब्द उच्चारायचे होते ते!"

त्याचा हा नेभळट युक्तिवाद एकून ती भयंकरच चिडली. ती खवचटपणानें म्हणाली, "वयाच्या उतरंडीची शोभा संभाळण्याची पायरी आम्हांला दाखवतांना, स्वतःसाठीं कांहीं पायरीच नाहीं, अशा भावनेनं वागतां तुम्ही! अणुरेणूलाहि शिस्त असते. त्या शिस्तींतून वृद्धांची वजाबाकी कुठल्याही परमेश्वरानं केलेली नाहीं. काय म्हणून नालस्ती केलीत तुम्हीं रुचिरांची?"

"मला वाटतं, रुचीरची बाजू उचलण्यांत भयंकर प्रमाद होत आहे राजकुमारीकडून!" मणिभूषण बोलू लागला, "राजकुमारी आपल्याविषयींची सगळ्यांची सहानुभूति निष्कारण कलुषित करून ठेवीत आहे. झालेली तडजोड एका क्षुद्र मुद्द्यावर आपटून फोडण्याचा सल्ला, रुचीरला आपणच दिलात! दहा मिनिटांच्या मुलाखतीत, तुम्ही एवढा प्रळय कराल, अशी जर राजेसाहेबांची कल्पना असती, तर ती मुलाखतच त्यांनीं घडूं दिली नसती. राजेसाहेबांच्या राजकारणाला, घरांतून शह देण्यांत तुम्हीं काय साधलंत कोण जाणे!."

स्वतःवरच्या आक्षेपांना उत्तर देण्याचें टाळून दुसऱ्याच्या उखाळ्या पाखाळ्या उपसणें किंवा स्वतःवरले आक्षेप सौम्य व्हावेत म्हणून दुसऱ्यावर आक्षेप घेत जाणें, हा निवळ मुर्दाडपणा आहे! परंतु मणिभूषणानें त्याचाच आश्रय घेतला. त्याच्या या वृत्तीचा तिला अगदीं किळस आला होता. तिच्या कपाळावर दोन आंठ्या एकदम सरसरून निघून गेल्या! ती उसळून म्हणाली,

"तो शह नसून माझ्या माणुसकीला पटणारा रास्त सल्ला होता! आणि मीं सल्ला दिला म्हणजे काय केलं? माहीत आहे आपल्याला! त्यांनीं मला काय सांगितलं अन् मीं त्यांना काय सांगितलं, याबद्दल हाच तर्क गोळा केलात होय! ज्या गोष्टीबद्दल कांहींदेखील माहिती नाहीं, तिची कांहीं तरी विकृत माहिती मांडून उगीच वणवा कां लावतां? राजघराण्यांत जन्माला येणाऱ्या व्यक्ती, म्हणजे प्रदर्शनांत मांडायच्या कळसूत्री बाहुल्या नव्हेत! त्यांनीं मनांत आणलं, तर विचार आणि आचार, यांचं स्वतंत्र अस्तित्व संभाळतां येतं त्यांना! बरं का सावकारसाहेब, बंगल्यांतलं घाण पाणी काढून न्यायला गटार आवश्यक आहे, हें मला समजतं; म्हणून सगळ्या बंगल्याचंच गटार बनवायचं, ही तुमची तर्कपद्धति मान्य करूं वाटतं! आणि रुचिरांची नालस्ती करण्यासाठीं, एवढंच का कारण बरोबर घेऊन फिरतां तुम्ही! भारीच बाई मुबलक शिदोरी बांधून निघालांत तुम्ही या प्रवासाला! सद्गुणाला थपडा द्यायला निघालांत, पण त्यामुळं त्यांना कांहीं न होतां बोटं मात्र झणझणतील तुमचीं!" ओंठ दाबून हंसें आंवरण्याचा आटोकाट प्रयत्न केला तिनें हें बोलतांना.

इतका वेळ बाबासाहेब तिऱ्हाइताच्या भूमिकेनें ऐकत बसले होते. रुचीरची नालस्ती मणिभूषणानें कां करावी, हा कुमारीनें केलेला सवाल ते मनांतल्या मनांत घोकीत होते. मणिभूषण कांहीं तरी समर्पक उत्तर देईल, ही अपेक्षाही फोल ठरली होती त्यांची. कुमारी इतक्या निग्रहानें रुचीरची बाजू सांवरून धरते, याचें कारण काय? त्यांचें गोंधळलेलें मन धड कोणच्याच वाटेनें निघत नव्हतें!

"तुम्हांला म्हणायचं आहे तरी काय?" किंकर्तव्यमूढ होऊन त्यांनीं कुमारीला प्रश्न केला, "रुचीरचं सगळं वागणं बिनचूक आहे असं म्हणतां तुम्ही? मी कशाविषयीं विचारतों, तें आलंच असेल तुमच्या लक्षांत?"

"लक्षांत न यायला काय झालं!" ती हंसून म्हणाली, "इतका वेळ तुमचं चालू असलेलं संभाषण, चुकून कां होईना, कानांत शिरलं आहे माझ्या. जाणूनबुजून कांहीं मीं ऐकलं नाहीं तें."

" कांहीं बिघडलं नाहीं त्यांत ! " बाबासाहेब म्हणाले, " त्यामुळेंच तुमचं मत ऐकावंसं वाटतं मला. सांगा, त्याचं हें करणं बरोबर आहे का ? "

" तें मी कसं सांगणार ? " कुमारी सहास्य वदनानें म्हणाली, " त्यांचे जन्मदाते वडिल आपण ! माझ्यापेक्षां आपणच त्यांच्या स्वभावाची बरोबर ओळख द्यायला हवी ! तरीदेखील तुम्ही विचारतां म्हणून सांगतें मी; सूज्ञांचीं मनं रत्न वेंचीत असतात, कांचा वेंचीत नसतात ! अर्थात् रत्न अमूकच जागेंत असायला पाहिजे, असं कांहीं निसर्गावर बंधन नाहीं. आणि मी सांगूं आपल्याला, रुचिरांच्याविषयीं स्वतःचं मत कुणाच्या सांगण्या-वरून दूषित होऊं देऊं नका. कदाचित् चुकत असतील ते तुमच्या दृष्टीनं तर तें त्यांना पटवून द्या. प्रत्यक्ष परिस्थितीचा जातीनं अभ्यास करा. बरेचसे गैरसमज दूर होतील दोघांमधले. "

" खरं आहे तुमचं म्हणणं. " बाबासाहेब मस्तक डोलवीत म्हणाले, " माझ्या मुलाविषयींची तुमची कळकळ पाहून मला अगदीं शरमल्यासारखं झालं आहे, निष्कारण त्याच्या भावनांचा भंग करून, समाधान घेणारं का हें पितृहृदय असेल ? "

अंतर्यामींच्या जिव्हाळ्याचा हा प्रश्न करतांना, म्हाताऱ्याचा घसा घोगरा होऊन, त्यानें डोळे टिपायला सुरुवात केली उपरण्यानें. कुमारीच्या हळव्या मनालाही चुटपुट लागून राहिली त्यामुळें. ती त्यांना अभिवादन करून, सदोष मणिभूषणकडे पाहात निघून गेली. उरलेली परिस्थिति अतिशय गढूळ असल्यामुळें, दोघेही विशेष कांहीं न बोलतां जाण्यासाठीं उपरणें झटकीत उभे राहिले.

पाठमोऱ्या शैलाकडे कोपदृष्टि फेंकीत मणिभूषण स्वतःशीं म्हणाला, " हिच्याही अंतःकरणांतून रुचीरच्या प्रेमाचे पडसाद उमटावेत हं ! शंकाच नको. यापेक्षां वेगळी संगतीच नाहीं या बाजू धरून बोलण्यांत ? "

बाबासाहेब जर विचारांत बांधलेले नसते, तर त्यानें सोडलेला तो लांबच लांब निःश्वास त्यांनाही ऐकायला मिळाला असता !

आणखी एका क्षणानेंच, विसंगत विचारांची मांडणी आंखीत ते रस्ता तोडूं लागले.

---

## प्रकरण १६ वें

# निराशेंतील वाट

उतरती वेळ झाली होती उन्हाची. समाधिस्थ योग्याप्रमाणें चलन-वलन स्थिर ठेवून उभे असलेले तरुवर, आतांसे समाधि उतरायला लागले होते ! सूर्याची आंच आतां पुष्कळच मंद झाली होती आणि त्यामुळें दुपारच्या भर उन्हांत करपण्याच्या भीतीनें आधींच लपून राहिलेली प्रसन्नता, चोरपावलानें मोकळ्यावर येत होती !

तिसऱ्या प्रहरच्या डाकेनें आलेलें रुचीरचें पत्र, स्वरूपनें फोडून नजरे-पुढें घेतलें होतें ! कडेला लिंबाच्या सरबताचा ग्लास तसाच भरलेला शिल्लक होता आणि मांडीवर स्त्री मासिकाचा अंक, पाहिजे तें पान उघडून तसाच पडला होता ! ती पत्रवाचनांत एकरूप होऊन गेली होती अगदीं. त्यानें लिहिलें होतें,

प्रिय स्वरूप,

पत्राच्या सुरुवातीला कुणी सप्रेम, साष्टांग अगर कृतानेक साष्टांग नमस्कार आणि आशीर्वाद वगैरे मायने लिहून, आपला नम्र भाव किंवा वडिलपणाचा जिव्हाळा ओतीत असतात ! पण मी काय लिहूं ! म्हटलं तर दोन्हीही लिहायला कांहीं प्रत्यवाय नाहीं. तारुण्यपूर्ण आयुष्याची सुरुवात, जर एकाच दिवशीं, एकाच वेळीं, अन् एकाच मुहूर्तावर दोघांनींही करायची, तर तिथें हा प्रघात कशाला ! एकाच सडकेनं जर दोन्ही चाकें चालणार आहेत, तर त्यांत अधिक मोलाचें अगर डावें उजवें ठरवण्याचें काय कारण ? आणि म्हणूनच हा मामुली प्रघात सोडून मी पत्राच्या मजकुराला सुरुवात करीत आहे.

आपल्या भावी आयुष्याच्या सुखमय कल्पना माझ्याबरोबरच प्रवासांत असल्यामुळें, माझा प्रवास खेळीमेळीचा अन् सुखावह असाच झाला. इथलें काम उरकतांच मी निघून येतों.

तुझ्या आदेशाप्रमाणं बारा आणे प्रेम कर्तव्यावर केलं पाहिजे !

पण खरं सांगायचं म्हणजे, राहिलेल्या चार आण्यांकडेच जास्त ओढ लागते! कारण त्यांखेरीज रुपया बंदा होत नाहीं!

स्वरूप, मी कर्तव्याधीन आहें कीं तुझ्या आधीन आहें, हेंच मला नीटसं कळत नाहीं. तुझ्याकडे आलों म्हणजे तूं मला कर्तव्याच्या वाटेनें ढकलून देतेस आणि त्यांच्यांत आलों म्हणजे, तीं तुझ्याबद्दलच्या आठवणींना उठावणी देऊन मला जास्त तत्पर बनवतात! ज्याप्रमाणं कोमल पारिजातकाचीं फुलं, वरून खालीं पडलीं तरी त्यांना पृथ्वी कोमल स्पर्शानेंच झेलीत असते, त्याचप्रमाणं तुमच्या दोघांच्या ओढा-ओढींत मला होत असून, त्या अगदीं गोड संवेदना आहेत!

इकडून चळवळीला पुष्कळच पाठिंबा मिळत आहे. आतां विजय आपल्या पाठीमागें धांवत येईल!

स्वरूप, लिहायचंच म्हटलं तर तुझ्या स्मृतीची शाई ज्या टांकांत आहे, तो टांक जन्मभर लिहीतच बसेल! नाहीं का! मग लिहूं या का आपल्या स्मृती? पत्राची वाट पाहात आहें. कळावें.

तुझा,
रुचीर

वारा निघून गेला तरी त्यानें आणून पोंचवलेल्या सुगंधाची जादू आणखी कांहीं वेळ शिल्लकच राहते. त्याचप्रमाणें पत्राचें वाचन संपलें तरी, स्वरूप त्यांतील अर्थाच्या उन्मादानें बेहोष होऊन बसली होती. आयुष्यांत कधीं काळीं जर सुखाचा क्षण येत असेल, तर त्या वेळच्या आनंदछटा, म्हणजेच कदाचित् आतां स्वरूपच्या चेहऱ्यावर दृग्गोचर होणारे आपटतरंग असूं शकतील! बराच वेळ याप्रमाणें गेल्यावर तिनें समाधानानें दमल्याचा एक दीर्घ निश्वास सोडला अन् ती आपल्याशींच उद्गारली, "आयुष्यांत एवढा एकच क्षण माझ्या सुखाच्या परमावधीचा समजायला पाहिजे. आण-खीन् एका क्षणानं माझं दैव कांटेकुंपणावर वाळत पडेल, कीं आणखी कुठें पडेल, त्याची आशा कां करावी!"

आणि फिरून ती समाधानांत निमग्न झाली. तिची ही आनंदसमाधि

आणखी किती वेळ टिकली असती कोण जाणे; पण ती फार वेळ टिकण्याचा योगायोग नव्हता. प्रगतीची हांक ऐकून तिला त्या समाधानांतून बाहेर यावें लागलें. प्रगति हांक मारून सांगत होती, " ताई, ए ताई, आज तुला भेटायला कोण आलं आहे बघ ! फार मोठं मोठ्ठं माणूस आलं आहे अगदीं ! "

स्वरूप घाईघाईनें उठून जिन्याच्या तोंडाशीं येते तोंच, तिला प्रगतीच्या पाठीमागून येणारी राजकुमारी दिसली. तिलाही आश्चर्यंच वाटलें तिच्या आगमनानें. तिनें झटपट आंत होऊन हातांतलें पत्र लपवलें आणि पुढें होऊन कुमारीचे दोन्ही हात हातांत घेत स्मितपूर्वक तिला उद्देशून म्हणाली, " या, आळशावर गंगा लोटली म्हणायची आज ! "

" असं हो काय अगदीं तिऱ्हाइतासारखं बोलतां ! मी बोलणारच नाहीं अशानं ! " समवयस्क मैत्रिणींतला रुसवा दाखवीत ती म्हणाली. तिच्याही मुखावरून रुळणारें या वेळचें निर्मल हास्य म्हणजे एक सुरेखसा स्मृतिसंगमच होता.

" आतां फिरून नाहीं म्हणणार असं कांहीं. " स्वरूप सहर्ष म्हणाली, " मग तर झालं ! आतां बसा पाहूं कशा ! "

" छान ! आतां आपण कशा अगदीं एका चवळीच्या शेंगेंत शोभणाऱ्या, बाळसेदार दाण्याप्रमाणं शोभतों ! नाहीं ? " प्रगतीनें विनोद केला.

" होय; " कुमारी म्हणाली, " जगानं हेवा करण्यासारखी शोभा आहे खरी ही ! पण आपण कुठल्याही दृष्टिआड आहोंत आतां; तेव्हां कोणाच्याही दृष्टीनं आपला वाळकेश्वर होण्याची धास्ती नाहीं ! "

वरचेवर उफळणाऱ्या हास्याच्या तुफान तरंगांनीं ती खोली कशी दरवळून गेली होती. युगानुयुगें त्या खोलींत समाधानाचें वास्तव्य असल्याचा भास होत होता.

" तिपडीचे तीन पदर एका ठिकाणीं आल्याचा भास होतो आहे आज ! " स्वरूप म्हणाली, " तीन शकलांनीं तिघडलेलं हृदय, जणूं काय फिरून एक झालं आहे आज ! हृदयांची एकवण परमेश्वराला शक्य आहे नाहीं ! "

" अहो, शक्य तर आहेच आहे ! पण तो त्याचा धंदाही आहे ! "

कुमारीनें उत्तर दिलें, "रुचिरांची तुमच्याशीं ओळख घालून देण्यांत, नाहीं तरी त्यांची धंदेवाईक दृष्टीच होती कीं!"

"इश्श!" सलज्जपणें स्वरूप उद्‌गारली, "तुमचं आपलं कांहीं तरीच! अशा अर्थानं कां विचारलं होतं मीं! भारीच बाई ह्या आहांत तुम्ही!"

तिची ती गोड तारांबळ या दोघींच्या आनंदाला हास्याची उकळी आणीत होती.

"एकंदरींत हें असं आहे काय!" कुमारी गमतीनें म्हणाली, "फार लवकर मजल मारलीत म्हणायची!"

"अभिजात प्रेमाला निसर्गाची मदत मिळत असते! आहे माहीत आपल्याला?" प्रगतीनेंच फिरून खोडसाळपणा केला.

"अग बाई! म्हणजे याही प्रेमाच्या निरनिराळ्या जाती आहेतच का!" कुमारीनें नवखेपणाचा आव आणीत विचारलें, "मला वाटत होतं कीं निदान या बाबतींत तरी निरनिराळी चांचेगिरी नसेल!"

"अकलेचं शिबिर उघडून बसलेल्या मनुष्यप्राण्यांचा संबंध जिथं येतो, तिथं व्हायचाच हा प्रकार!" प्रगतीचे विचार होते हे.

"पहा हं मी कशी वेंधळी आहें ती!" नितांत रम्य हास्य करीत राजकुमारी म्हणाली, "ज्या कामासाठी आलें, तें या बोलण्याच्या नादांत अगदीं विसरणीला जाऊन दडलं! आतां यांनीं शिबिराचं नांव काढलं, म्हणून तरी आठवलं!"

"प्रगति, दुर्मिळ पाहुण्या उगवल्यात आज; थोडं पाणी तरी आणशील!" स्वरूपनें प्रगतीला सांगितलें. शैला नको म्हणत असतांही तिकडे मुद्दाम दुर्लक्ष करून प्रगति गेली.

"हं बोला आतां." प्रगति गेली असें पाहून स्वरूप बोलूं लागली, "मला कित्ती कित्ती बोलावंसं वाटतं तुमच्याशीं. तुमच्याबद्दल बोलतांना रुचीर कसे अगदीं स्वतःला विसरून जातात. तडजोडीच्या वेळीं तुम्हीं दिलेला सल्ला, म्हणजे ते स्वतःच्या हयातीचं ध्येय समजतात. तुमच्याबद्दलच्या

एकएक गोष्टी ते सांगूं लागली म्हणजे मला असं होत कीं, एकदम उठून तुमच्याजवळ यावं; पण न जमणाऱ्या गोष्टी मनांत येऊन काय उपयोग !"

रुचीर आपल्याबद्दल बोलत असतात, एवढं ऐकण्यानंच कुमारीचं हृदय तृप्त झालं होतं. त्याच्या स्मृतीच्या कुठल्या तरी एका कप्प्यांत, चिरंतनच्या स्मारकाप्रमाणें आपण पडून आहोंत, एवढी एकच गोष्ट तिला समाधान देत होती. रुचीरच्या स्मृतितंतूंत आपल्याबद्दलच्या आठवणी गुंफल्या गेल्या आहेत, इतकें समजण्यानेंच तिचे डोळे हंसूं लागले होते. ती आनंदातिरेकानें उठली आणि स्वरूपजवळ जाऊन एकाद्या अनभिज्ञ बालकाप्रमाणें तिच्या वक्षस्थलावर मस्तक ठेवून तिनें समाधानानें आपले डोळे मिटले आणि म्हटलें, "न जमणाऱ्या गोष्टी अशा तऱ्हेनं जमवून त्यांतला आनंद आपण लुटूं या ! मला आपली धाकटी बहीण समजून माझं एक काम कराल तुम्ही ?"

किती लडिवाळ विनंति होती ही ! स्वरूपच्या कोमल भावनांना मारलेली ही जिव्हाळ्याची हांक, तिला पुष्कळसं समजून सांगून गेली. तिला वस्तुस्थितीचें पूर्ण ज्ञान झालें होतें. तिनें निश्चयानें स्वतःचें मन तयार केलें आणि गंभीरतेला बळेंच हंसवण्याचा प्रयत्न आरंभला.

"धाकटी बहीण म्हटल्यानंतर थोरल्या बहिणीकडे कर्तव्याची बाजू येतेच आपोआप." स्वरूप तिचे केंस कुरवाळीत स्मितपूर्वक म्हणाली, "स्त्रीहृदय स्त्रीहृदयाची फार लवकर ओळख घेतं. एकाच ध्येयवाटेनं धांवत जात आहोंत आपण ! पण त्यांत हेवा करण्यासारखं कांहींच नाहीं. उदारहृदयी जलधीकडं नद्यांनीं धांव घेणं, हें निसर्गाला धरूनच आहे! बोला ना ! अशा गप्प कां ! थोरल्या बहिणीजवळ बोलायला संकोच कां म्हणून ! मी माझ्या प्रगतीसाठीं जो स्वार्थत्याग करीन, त्यापेक्षांही अधिक तुमच्यासाठीं करीन. तुमच्या भावना दुभंगू नयेत म्हणून अन् तुमच्या नि माझ्या समाधानासाठीं, मी माझ्या सुखमय परिस्थितीचा अगदीं सहज त्याग करूं शकेन ! बोला गडे कांहीं तरी !"

"समाधानाच्या समाधींत मीं माझ्या भावना सांठवून ठेवल्या आहेत. त्या आतां मोहाच्या निखाऱ्यावर सांडू द्यायला माझी तयारी नाहीं." ती हळू हळू बोलूं लागली. तरीदेखील विषादाच्या पुसट पुसट छटा तिच्या

च[illegible]न कांवरल[illegible] [illegible]सत होत्या ! [illegible]ण्याच्या ओघाबरोबर त्या [illegible] आसवें वा[illegible]न [illegible] होत्या ! ती पुढें बोलूं लागली, " स्त्रीहृदयाला त्याग ही अ[illegible] [illegible]सुलभ गोष्ट आहे अन् तो तुम्ही माझ्यासाठीं कराल, हेंही पण मल[illegible] [illegible]मजतं आहे; पण तसं करायची आतां जरूर नाहीं. ताई, हो; ताईच म्हणणार मी आतां तुम्हांला ! रुचिरांच्या सत्याग्रही पथकांत मला दाखल व्हायचं आहे. रुचीर इथं नाहींत आणि असते तरी मानलं नसतं माझं त्यांनीं. तूं सांगशील त्यांना माझ्यासाठीं ? पण तसं नको ! तूंच घे माझी प्रवेशपत्रिका भरून ! "

" शैला, निराशेच्या तीव्रतेनं ही वाट दाखवली होय तुला ! असल्या समाधानानं कां निराशेला शृंगारून काढणार तूं ! या युक्तीनं त्यांना विसरण्याचा तूं प्रयत्न करणार होय ? वेडी कुठली ! तुझ्या स्वार्थत्यागाला मी अशा तऱ्हेनें बळी घालीन, असं स्वप्नांतसुद्धां आणूं नकोस. पाहीन मी मला काय करतां येईल तें. त्राग्यानं भलतंच कांहीं करूं नकोस असं. " स्वरूपनें तिला जवळ घेऊन सांगितलें. तिच्या सगळ्या कोमल भावना, तिनें निराशेला वाहून टाकण्याच्या निश्चयानें उत्तर दिलें हें. सगळ्या आशांचं होमकुंड करायला सिद्ध झाली होती ती.

" असं कांहीं तरी बोलूं नकोस गडे ! " राजकुमारी अनुनयानें म्हणाली, " तुला तुझी शैला हवी आहे ना ! "

तिच्या या पोरकट विनवणीनें स्वरूपच्या गांभीर्याला हंसावेंच लागलें ! ती तिच्या गालावर लाडिकपणानें एक गोडशी चापट मारून म्हणाली, " चल; चावट कुठली ! अग, शैला हवी आहे म्हणून तर हें सारं. माझ्या शैलासाठीं एवढं देखील नको करायला मीं ? " अखेरचे शब्द तिनें जवळ जवळ स्वतःलाच विचारले होते.

" नको, नको, नको ! किती वेळां सांगूं नको म्हणून ! तूं असलं कांहीं करणार असशील, तर मी काय करीन माहिती आहे ! जिवाचं बरं वाईट करून... ! "

" शैला ! " तिच्या तोंडावर हात ठेवून स्वरूप घाबरेपणानें म्हणाली, " कसला भेसूर विचार बोलतेस हा ! श[illegible]च्या मलीनं असला अविचार

का करायचा असतो ! काढून टाक हा अविचार मनांतून. तूं म्हणशील तें ऐकेन मी. मग तर झालं ? पण मला सांग, त्यांना तूं इतक्या आटोकाट प्रयत्नानंतरही जर विसरली नाहींस तर ? कारण माणसाच्या भावना जळत राहिल्या तरी मरणार नाहींत ! उकळत राहिल्या तरी आटणार नाहींत आणि घांसल्या तरी पुसणार नाहींत ! काय करशील बरं अशा वेळीं तूं ? "

" तर मी त्या परिस्थितींत तुला—माझ्या ताईला शरण येईन ! मग तर झालं ! तुझी शपथ मी तसं करीन. आतां तर होईल ना माझं काम ? म्हण ना करीन म्हणून ! "

" करीन बापडी ! " स्वरूप क्षीण आवाजांत म्हणाली.

स्वरूपच्या सगळ्या सात्त्विक भावनांनीं कलकलाट करून सोडला होता तिच्याभोंवतीं. या वेळीं तिचें मन तिच्यावर स्वार्थीपणाचा आरोप करूं पाहात होतें. तें बिचकलेल्या हरिणीप्रमाणें दाही दिशांना पळून थकलें होतें ! बिनथार भणंगाप्रमाणें त्याला कुठेंच आसरा मिळेना. तिची थकलेली निराशा म्लानपणें शैलाकडे पाहात बसली !

शैलाची मुखश्री अपूर्व विजयाच्या वैभवानें मोहोरली होती ! ती स्वरूपला म्हणाली, " असं ग काय करतेस अगदीं ! आतां हांस पाहूं कशी ! "

स्वरूप हंसली, शैला हंसली आणि आंत येणारी प्रगतीही हंसली ! भावनांच्या निरनिराळ्या वाटांनीं, एका ठिकाणीं उधळायला आलेल्या या हास्यांतून किती निरनिराळे पडसाद उमटत होते !

पुढ्यांत आलेलें पेय घेऊन होतांच, रिकामे ग्लास एका बाजूला ठेवून कुमारी जाण्यासाठीं उभी राहिली आणि अल्पावधींतच, तृणांकुरांतून लपत छपत धांवपळ करणाऱ्या वाऱ्याप्रमाणें, मागें पुढें पाहात वांकड्या मानेनें मुरके घेत, निघून गेली !

तिच्या मोटरीची धडधड, स्वरूपला तिच्या हृदयाच्या धडधडीमुळें मुळींच ऐकूं आली नाहीं !

---

## प्रकरण १७ वें

# नवीन वाटेनें निघालेले विचार

भगवान सहस्रकरानें आपले अनंत हस्त, दडणीदडणींतून पाठवून, झोंपलेली कार्यतत्परता जागी केली होती. अंधारांत दडून वाटजनांना ठेंचा देणारे दगड आणि बोंचणारे कांटेकुटे, यांना त्यानें उजेडाच्या पायधुळीवर उडवून जगासमोर फेंकलें होतें. अवघा काळोख तेजाच्या कणाकणांतून विरून अदृश्य झाला होता, आणि रात्रीं विश्रांतीच्या शय्येवर झोंपी गेलेले सगळे विचार, उगवत्या उल्हासानें फिरून कामाला लागले होते.

अंधाराची अदृश्यता आणि उगवत्या किरणांची परिस्फुटता, यांच्या सरहद्दीवर उभे राहून, बाबासाहेब स्वरूपच्या बंगल्याच्या फाटकांतून डोकावत होते. आयुष्यांतील अनुभवांच्या ओझ्यानें ते आतां इतके वांकले होते कीं, कळकीच्या जाडशा डांगू काठीवर, ते त्यांना तोलून धरूं पाहात होते! या वेळीं त्यांच्याकडे पाहणाराला असें वाटलें असतें कीं, थकलेल्या आयुष्याच्या विश्रांतीचा शोध करीत करीतच ते बाहेर निघाले असावेत!

सकाळच्या वैभवपूर्ण वातावरणांतून नेहमींप्रमाणें सहल करून परत फिरलेली प्रगति, फाटकांतून आंत शिरत असतां यांना पाहून उभी राहिली आणि अत्यंत अदबीनें त्यांच्याजवळ येऊन म्हणाली, " कोण हवं आहे आपल्याला? बरेच थकलेले दिसतां आपण. आंत होऊन एकाद्या बांकावर बसा ना! म्हणजे बरं वाटेल तुम्हांला."

असें कोणीं तरी म्हणावें, यांतच त्यांच्या इच्छेचें साफल्य होतें कीं काय कोण जाणे! ते हळू हळू आंत जाऊन एका बांकावर बसले आणि सभोंवार आपली दमलेली नजर फिरवून, त्यांनीं आपलें समाधान बागेंत फिरायला म्हणून मोकळें पाठवून दिलें!

" बसा हं थोडा वेळ; मी आतां इतक्यांत परत येतें." प्रगति त्यांना म्हणाली आणि त्यांनींही तिला मान हलवून संमति दिली. एका वृद्धाच्या अनुभवकथा थोडा वेळ तरी ऐकायला सांपडतील, म्हणून झालेल्या निर्मल

आनंदाच्या अधीरतेनें प्रगति तेथून गेली आणि कांहीं थोड्या वेळांतच स्वरूप-सह परत आली. स्वरूपनें येतांच अत्यंत आदरानें त्यांना प्रणाम केला आणि त्या दोघीही त्यांच्या समोरच्याच बांकावर विनयपूर्वक बसल्या. त्यांचा तो सहजसुंदर विनयही म्हाताऱ्याच्या काकदृष्टींतून निसटला नाहीं.

"आपण कोणाकडे पाहुणे आलां आहांत वाटतं इथं ?" स्वरूपनें सौजन्यानें विचारलें.

"फार जुन्या ओळखीचा पाहुणा म्हणून मी आलों आहें इथं !" त्यांनीं उत्तर दिलें.

त्यांच्या या उत्तरांत फारशी अतिशयोक्ति होती असें नाहीं. खरो-खरच ते गेल्या दहाबारा वर्षांत इकडे आले नव्हते. रुचीर सगळे व्यवहार पाहूं लागल्यापासूनच नव्हे; तर त्याच्या अगोदरही बरींच वर्षें त्यांनीं इकडे येण्याचें सोडून दिलें होतें. कारण त्यांच्या प्रकृतीनें अलीकडे बरींच वर्षें कुरकुर सुरू केली होती. त्यामुळें त्यांचे दिवाणजीच बहुतेक कामें उरकीत असत. तथापि तेवढ्यानें त्यांच्या सगळ्या ओळखींना जुनेपणाचा गंज चढला होता असें नाहीं. कांहीं तरी विशेष उद्देशानेंच त्यांनीं हा कांगावा सुरू केला होता.

"मधल्या काळांत ओळखीचे दुवेन् दुवे तुटून स्मृतिआड झाल्यामुळं, मीं कुठल्या तरी नव्या जगांत आल्याचा भास होतो आहे आतां ! नवीं माणसं, नवे चेहरे, नवीं घरं, सगळंच नवीन ! ओळखीनं उगाळायला जुन्याचा अवशेषदेखील दिसेना कुठं ! जुन्या इतिहासाच्या दोन पिढ्या उलगडून दाखवल्या तेव्हां कुठं वस्तीची सोय लागली !"

वास्तविक प्रकार थोडासा वेगळाच होता त्यांच्या सांगण्यापेक्षां. पुष्कळसा नवीन प्रकार होता खरा; तरी त्यांच्या ओळखी कांहीं बुजून गेल्या नव्हत्या. मणिभूषणाचा आणि त्यांचा फार निकटचा स्नेह होता. दैनपत्र्याप्रमाणें फिरणारा मणिभूषण यांचा शाळासोबती होता. अत्यंत हलाखीची स्थिति होती त्या वेळीं त्याची. कित्येक वेळां पडणारे उपवास तो यांचे घरीं येऊन सोडीत असे. त्याची ही परिस्थिति, त्याच्या कोट्यधीश निपुत्रिक मामानें त्याला दत्तक घेऊन घालविली होती.

गरिबीबरोबर नांदणारे सद्‌गुण जरी त्याला सोडून गेले होते, तरी त्या वेळच्या उपाशी आठवणी त्याला सोडून गेलेल्या नव्हत्या; आणि त्यामुळें तो आपल्या स्नेह्यांना अजूनही तेवढ्यापुरतें मानीत असे. मग तो बाबासाहेबांना कसा विसरणार! शिवाय रुचीर आणि स्वरूप यांचेही संबंध तोडायचे होते त्याला! त्यासाठींही त्याला बाबासाहेबांना विसरायचें नव्हतें.

त्यानें आस्थेनें त्यांचें स्वागतही केलें होतें, त्यांना राहायला जागाही दिली होती, त्यांच्या जेवणाची वगैरे मिजासही राखली जात होती आणि त्याबरोबरच रुचीर, स्वरूप संबंधांचें कारस्थानही कोरलें जात होतें! अशी वस्तुस्थिति असतांही आपण अगदींच नव्या वाटेवर उभे असल्याचें मिष बाबासाहेब करीत होते. हेतुपुरस्सर आडवाट घेतली होती त्यांनीं.

आज तर त्यांनीं मुद्दामच इकडे मोर्चा फिरवला होता. मणिभूषणांनाही थांग नव्हता या गोष्टीचा. त्या दिवशीं बागेंत मणिभूषणांची शैलानें केलेली पूजा आणि त्याच वेळीं तिनें प्रदर्शित केलेले विचार, यांनीं त्यांची स्वतंत्र बुद्धि जागी केली होती. तेवढ्यामुळेंच, या मुली तरी कसल्या आहेत आणि त्यांचे स्वभाव तरी काय आहेत, हें अजमावण्याची आतुरता त्यांना इकडे घेऊन आली होती.

"कोणाकडे उतरलांत आपण?" प्रगतीनें त्यांना विचारलें, "अन् इतक्या सकाळींच इकडे कुणीकडे आलां होतां? कां कांहीं स्मृतीचे अवशेष दृष्टीस पडतील म्हणून बाहेर पडलां होतां?"

"बऱ्याचशा उद्देशांत तोही एक होताच; पण मुख्य उद्देश म्हणजे नित्याप्रमाणं, थोडंसं मोकळ्या हवेंत फिरणं हाच होय. मणिभूषणकडं उतरलों आहें मी."

"अग बाई!" स्वरूप आश्चर्यानें उद्‌गारली, "मणिभूषणसारख्या पन्नाशीच्या पंक्तींतल्या माणसानं, दोन पिढ्यांची ओळख उकरून घेतल्यानंतर वस्तीला जागा दिली तुम्हांला! किती युगांपूर्वींचे गृहस्थ वाटलांत तुम्ही त्यांना? माझ्या दृष्टीनं तुम्ही तर समवयस्क दिसतां!"

"व्यवहारी दृष्टीचा चष्मा लावल्याखेरीज, मधलं अंतर मोजतां नाहीं यायचं!" त्यांनीं सस्मित उत्तर दिलें.

किती तरी दृष्टीनें अर्थपूर्ण उत्तर होतें हें ! पण तें त्या अनभिज्ञ मुलींना समजलें नाहीं. स्वार्थाच्या निखाऱ्यावर त्यांच्यासारखीं सुंदर फुलें ओढून घेणाऱ्या जगाकडे कोणत्या दृष्टीनें पाहावें, याचा त्यांना तितकासा अनुभव नव्हता. हे वृद्ध गृहस्थ आपल्या अनुभवाचें बोंचकें सोडून, त्यांतून कांहीं तरी आठवण ठेवण्यासारखी चीज आतां दाखवणार आहेत, अशाच उत्कंठेनें त्या त्यांच्याकडे पाहात बसल्या. "जुना इतिहास वाचल्यावांचून पूर्वजांचे प्रताप आणि वैभव समजत नाहीं आणि मागच्या ओळखी वाचल्या-वांचून, जुने संबंध जिवंत होत नाहींत ! मला तेंच करावं लागलं माझी ओळख पटवायला म्हणून !" त्यांनीं फारसें खोल पाणी न उपसतां, आपण जुने स्नेही असतांही आपल्याला इतकें करावें लागलें, असें दाखवलें.

"एक वेल पैशानं पोसली गेली म्हणून मांडव झांकून टाकते अन् दुसरी भुई धरून बळें जिवंत राहण्याचा प्रयत्न करते ! परस्परविरोधाचा मनो-रंजक नमुना आहे खरा हा ! विधात्याच्या हेतूचं किती रम्य चित्र आहे हें !" स्वरूप म्हणाली.

"विधात्याच्या हेतूचे गोडवे निदान मी तरी नाहीं बाई गात बसणार!" प्रगति तिरस्कारानें म्हणाली, "यांत कसला आला आहे हेतून् फितू ! हा शुद्ध आचरटपणा आहे झालं ! पैशांच्या देव्हाऱ्यांतल्या विंचूची पूजा व्हावी अन् खरे देव उकिरड्यावर दडून राहावेत, या माणसांच्या हेतुपुरःसर पागल-पणाला, विधात्याच्या हेतूची कसली पुस्ती देत बसतां ! आपणच सांगा पाहूं," ती बाबासाहेबांच्याकडे वळून म्हणाली, "ठिकाण निराळं झालं, म्हणून वस्तूच्या किंमतींत फरक पडतो ? रत्नासारख्या मोलाच्या वस्तू कचऱ्यांत सांडल्यानं, त्यांचं मोल सांडतं ?"

"असं कसं होईल !" बाबासाहेब हंसत म्हणाले; पण याच वेळीं ते सगळ्याच परिस्थितीकडे या नव्या दृष्टीनें पाहूं लागले.

रत्नादि मूल्यवान वस्तू कुठल्याही कचऱ्यांत पडल्या, तरी त्यांच्या मोलाला धक्का बसत नाहीं. हें तत्त्व त्यांना कांहीं तरी निराळेंच शिकवूं लागलें. ते आपल्याशींच म्हणूं लागले, 'घाणींत पडलेलं सोनं आपण उचलून घेतों, मग एकाद्या वाईट घराण्यांत जन्माला आलेली सुशील मुलगी आपण

कां नाकारतों ? मनुष्यप्राण्यानें चांगल्या गोष्टींचें संग्राहक बनावें; मग ती गोष्ट कुठल्याही परिस्थितींत, कुठल्याही जागीं जन्माला येवो. विकृत कल्पनांना जिवाशीं घट्ट आंवळून, सुंदरतेला मात्र हिडीस म्हणून पाहायचें, याचा अर्थ काय ? ''

त्यांचें मन आतां या अर्थामागून धांवत सुटलें होतें. त्यांचे विचार नव्या वाटेनें निघाले होते आणि तेही त्यांच्या मागून निघाले होते ! एकाद्या माथेफिरूप्रमाणें, कांहीं एक न बोलतां, ते उठून चालूं लागले होते.

फाटकांतून ते बाहेर पडायला अन् कुमारीची मोटर तेथें येऊन थडकायला एकच गांठ पडली. कुमारीनें त्यांना पाहिलें. परंतु त्यांचें मुळींच लक्ष नव्हतें इकडे तिकडे. मोटर उभी राहीपर्यंत ते गेलेही पण निघून. तिनें तिच्याजवळ येऊन उभ्या राहिलेल्या स्वरूपला विचारलें, " हे इकडे कशाला आले होते ? "

" आले होते बापडे सकाळच्या वेळांत फिरायला म्हणून ! " प्रगतीनें ज़वळ येऊन उत्तर दिलें.

" तुझी त्यांची ओळख आहे वाटतं ? कोण गृहस्थ ते ? " स्वरूपनें तिला उत्कटतेनें विचारलें.

कपाळावरचा घाम हातरुमालानें पुशीत कुमारी म्हणाली, " काय सांगूं ! ते निघूनहि गेले. " ती थांबली अन् कपाळावर आलेली केंसाची बट मागें ढकलून म्हणाली, " रुचिरांचे वडिल आहेत ते ! "

" अग बाई ! हें काय भलतंच झालं ! " स्वरूप घाबरेपणानें उद्‌गारली नि त्या तिघीही विषण्ण अंतःकरणानें आंत निघून गेल्या.

---

## प्रकरण १८ वें

# दुधारी शस्त्र

मनुष्य नेहमीं कसल्या तरी हेतूंचें जाळें गुंफून त्यांत स्वतःला गुरफटून घेत असतो. रुचीरचेंही तसेंच झालें होतें जवळ जवळ. चळवळीचीं सगळीं सूत्रें सध्यां त्यालाच हलवावीं लागत होतीं. वडिलांच्या वृद्धापकाळामुळें प्रपंचही त्यालाच पाहावा लागत होता. स्वरूपच्या भावनांची चुरगळ होऊं न देण्याची जबाबदारीही त्याच्यावर होती आणि नकळत का होईना, कुमारीसाठींही कसलीं तरी बंधनें त्यानें स्वतःभोंवतीं गुरफटून घेतलीं होतीं !

या सगळ्या फांपटपसाऱ्याकडे पाहतांना, रुचीर स्वतःच गोंधळून जात असे एकादे वेळीं. त्याला त्याच्या सभोंवार, त्याच्या ध्येयाचीं उन्नत शिखरें आपल्याकडे हांका मारीत असलेलीं दिसत होतीं; परंतु तिकडे जाण्यासाठीं ज्या वेळीं तो मार्ग पाहूं लागे, त्या वेळीं त्याला पुसट, मोडकीतोडकी अशी पाऊल-वाटसुद्धां दिसत नसे. कांहीं कांहीं वेळेला इतक्या असंख्य वाटा त्याच्या नजरेसमोर नाचत की, त्यांपैकीं कोणती धरावी, याचाच उलगडा होणें कठिण ! आणि अशा वेळीं साहजिकच तो सगळी शिखरें दृष्टीपुढून पुसून काढून, एकट्या स्वरूपचेंच चित्र नजरेसमोर ठेवीत असे ! त्याला त्याच्या सगळ्या आयुष्याची पूर्तता एका स्वरूपच्या ठिकाणींच झाल्याचा भास होई ! परंतु या मनःस्थितींत तो फार थोडा वेळ राहात असे. त्याला त्याची कर्तव्यबुद्धि ताबडतोब वाटेवर आणून उभी करीत असे.

आजही तसेंच झालें. स्वरूपला पत्र लिहून पोष्टांत टाकीपर्यंत, तो ज्या भावनांच्या जादूनें जखडला होता, ती जादू.....ती गुंगी पुढच्या क्षणाला पार उतरून गेली आणि तो सत्याग्रह पथकांचे क्रमांक जुळवण्याच्या मागें लागला. पथकांच्या क्रमवारीनंतर, आपल्या पाठीमागून होणाऱ्या डिक्टेटरांचीही यादी त्याला तयार ठेवायला पाहिजे होती. यंत्राप्रमाणें भराभर एक एक गोष्ट उरकून दुसरी करायला तो तयार होता ! इतक्यांत

एका स्वयंसेवकानें येऊन त्याला वर्दी दिली कीं, दिवाणसाहेब भेटायला आले आहेत. अर्थात् हातांतलें काम बाजूला सारून, त्याला मुलाखतीसाठीं स्वतंत्र जागेंत जाणें भाग पडलें. तिकडे जात असतां त्याच्या मुद्रेवर, दिवाणसाहेबांच्या अनपेक्षित आगमनाचें आश्चर्य दृग्गोचर झालें होतें.

"अत्यंत महत्त्वाच्या कामासाठीं आलों आहें मी आज." दिवाणसाहेबांनीं बोलायला सुरुवात केली. त्याबरोबरच त्यांनीं स्वतःजवळचा एक वर्तमानपत्राचा अंक काढून त्याच्यासमोर धरला. त्यांतली कपाळावरची हेडलाईन वाचून तो अतिशयच आश्चर्यांत पडला. सत्याग्रहपथकांत शैलबाला सामील झाल्याची बातमी होती ती. या अनपेक्षित बातमीनें केवढें काहूर उठवलें त्याच्या मनांत !

"हें कसं झालं ?" तो स्वतःच्या मनाशीं जरा मोठ्यानें म्हणाला.

"म्हणजे ?" दिवाणसाहेब आश्चर्यानें उद्‌गारले. "आपल्याला या घटनेची दादही नाहीं वाटतं अजून ! मग मात्र आश्चर्य आहे !"

"मला कुठून दाद असणार ! कालच्या बातम्या येथें आज येणार आणि त्या डिलिव्हरीला अजून अवकाश आहे बराच."

"हो; आहे खरं असं. आज मी प्रायः याच कामासाठीं आलों आहें. बाब किती नाजूक आहे, हें आपण जाणतच आहां !"

"होय; तें मी चांगलं जाणून आहें." रुचीर म्हणाला, "मला म्हणजे यांतलं कांहींसुद्धां माहीत नाहीं. मी इकडे आल्यानंतर प्रकार घडला आहे हा."

"शक्य आहे ! आमची अर्थात् राजेसाहेबांची अशी अपेक्षा आहे कीं, आपण हा अनिष्ट प्रकार थांबवूं शकाल." एवढें बोलून ते अपेक्षित उत्तराच्या अपेक्षेनें त्याच्याकडे पाहात बसले होते.

"इष्ट कीं अनिष्ट हा वाद निरर्थक आहे. रोजच्या परिस्थितींत नेहमीं कांहीं तरी क्रांति होत असते ! त्यांतलाच हा एक नमुना आहे; पण त्यामुळें उभ्या झालेल्या परिस्थितीची जाणीव मी टाकणार आहें असं नाहीं !" अतिशय विचारपूर्वक बोलत होता तो. "दोन्हीही बाजूंवर यामुळें निरनिराळे परिणाम होणार आहेत, हें मला स्पष्ट दिसतं आहे; पण तिच्याही बाजूनं विचार करायलाच पाहिजे कांहीं. तिनेंही आपलं पाऊल कांहीं तरी

६

विचारपूर्वकच उचललं असेल ! इतक्या सगळ्या गोष्टी समोर असतां, तिनं ही वाट कां ओढली हेंही समजून घेतलं पाहिजे. तिच्या भावना काय आहेत, स्वयंस्फूर्तीनं या संग्रामांत उडी घ्यायचं तिनं ठरविलं कीं अन्य कोणाच्या उठावणीनं ठरविलं, हेंही पण पाहायला पाहिजे. तिच्या प्रामाणिक भावनांचा निष्कारण अपमान करण्याचं भाग्य मला नको आहे ! "

" हें ठीक झालं आपलं म्हणणं ! " दिवाणसाहेबांनीं बोलायला सुरुवात केली, " पण दुसऱ्याही कांहीं गोष्टींकडे आपलं लक्ष जायला पाहिजे. आपल्या लंगड्या बाजूला लोकांचं पाठबळ मिळावं म्हणून कुमारीला या भरीं घातलं गेलं, असाही प्रवाद यामुळं उत्पन्न होईल ! आपल्या निष्कलंक चळवळीला असलं गालबोट लागावं, हें बरं नाहीं ! मी सद्धेतुपूर्वक सांगतों हें ! "

" आपल्या हेतूबद्दल कसल्याच उण्या भावना वापरणार नाहीं मी. " रुचीर म्हणाला, " परंतु राजघराण्याच्या इभ्रतीला धोका येतो या विकृत भावनेनं, आमच्या चळवळीवर शेर्णाशितोडे उडवायचे, या वृत्तीला काय म्हणूं मी ? राजकुमारीचं हत्यार जसं आमच्या चळवळीवर चालवूं पाहतां, तसं तें विरुद्ध बाजूलाही चालूं शकेल. आमची चळवळ निष्प्रभावी ठरावी म्हणून, राजकुमारीचं प्यादं दरबारनंच पटावर पुढं सरकवलं, असं म्हणणंही फारसं अवघड नाहीं ! दुधारी शस्त्र आहे तें ! "

या उत्तरानंतर रुचीर असा कांहीं गोड हंसला कीं, त्या हास्यतुषारांनीं दिवाणसाहेब पुरेपूर हताश झाले. आपलें बोट आपल्याच डोळ्यांत जाईल ही कल्पनाही नव्हती त्यांना. उलटलेला डाव परत परतवण्यासाठीं ते वाट पाहात होते.

" पण असं मी म्हणणार नाहीं. " रुचीर पूर्वानुसंधानानें बोलूं लागला. " कुमारीच्या अभिमानी मनाची मला पूर्ण जाणीव आहे. अपमानास्पद परिस्थितींत मीं तडजोडीला मुळींच मान्यता देऊं नये, असा बाणेदार सल्ला देणारी कुमारी अविचार करील हें मुळींच संभवत नाहीं ! "

" तें कसंही असो, " दिवाण म्हणाले, " परंतु राजेसाहेबांच्या लौकिका-खातर, आपण तिला परावृत्त करण्याचा प्रयत्न जर केलात तर— ! "

" लौकिकाचं स्वरूपच समजेनासं झालं आहे मला ! " रुचीर हंसत म्हणाला, " तथापि मी जरूर प्रयत्न करीन. आमच्यांतील सलोख्याचे संबंध उज्ज्वल ठेवण्यांत मी कसूर नाहीं करणार. कुमारीच्या सोज्ज्वल भावना न दुखवतां, मला जितकं करतां येण्यासारखं आहे, तें सगळं करीन. मग तर झालं ? "

" होय; एवढ्या अभिवचनानंही आमचं पुष्कळ समाधान होऊं शकेल! " त्यांच्या निराश आशेनें उत्तर दिलें, " राजेसाहेबांना रयतेसाठीं पुष्कळ करावंसं वाटतं; पण नाइलाज आहे ! "

" तें मी जाणून आहें ! " रुचीर कुत्सितपणानें म्हणाला, " कांहीं न करण्याच्या निश्चयाला, नाइलाज हा शब्द तोंडपाठ आहे ! कोरड्या झऱ्यांत पाणी कुठून असणार ! पण हा विषय आतां अप्रस्तुत आहे. चराचराचें रुचिवैचित्र्य प्रत्येक क्षणाला कसलं तरी नवं रेकॉर्ड उत्पन्न करीत आहे ! या भरडणांतून राजेसाहेब कायमचे सुटलेले आहेत असं नाहीं ! दगडाचे देव बनवतां येतील आणि येतातही ! "

" तशा शुभ प्रसंगाचीं मीही आतुरतेनं वाट पाहात आहें ! " दिवाण उठतां उठतां नमस्कार करीत म्हणाले.

" Thanks ! " रुचीरनें त्यांना निरोप दिला.

---

## प्रकरण १९ वें

# कोळशाचें अंतरंग

विचारांना कधीं झोंप नसते. मग ते कोणत्याही जातीचे असोत. माणसाचे विचार झोंपेंत दडल्याचा आभास होतो! परंतु स्वप्नांतले विचार जसेच्या तसे सांगतां येत असल्यामुळें, विचारावेगळी परिस्थिति झोंपेतसुद्धां असू शकत नाहीं, हें सहज समजून येतें! कित्येक वेळा अशा येतात कीं, विचारांच्या अतिरेकानें आधीं झोंपच पळवून नेली जाते; आणि मग विचारच जेव्हां दमतात, तेव्हां ते माणसाच्या झोंपेंत प्रवेश करून स्वप्नांच्या रूपानें वावरत असतात!

आज बाबासाहेबांचें अगदीं हुबेहूब असेंच झालें होतें. मणिभूषणांच्या विलासी भुवनांत, मध्यरात्र झाली तरी ते अजून जागेच होते. विचारांचें रान उठलें होतें त्यांच्या डोक्यांत. स्विच ओढून बत्ती विझवल्यानंतर, उघड्या डोळ्यांनीं काळोखाच्या पृष्ठभागाकडे पाहात पडले होते ते. जणूं काय शुभ्र रजनीच्या काळ्या पृष्ठावर दिवसां घडलेलीं कर्में, दृग्गोचर स्वरूपांत वावरतांना दिसतात कीं काय, हेंच पाहात होते ते! मनुष्याची स्वप्नसृष्टि म्हणजेच कदाचित् वरील परिस्थितीची पुढची पायरी असेल, अशाही विचारांच्या लाटा त्यांच्या मनश्चक्षूपुढून धांवत असतील या वेळीं!

सारांश, अमुकच कांहीं विचार त्यांच्या मनोभूमींत या वेळीं रुजलेले असतील, असें सांगणें फार कठिण होतें. तथापि त्यांचे विचार आपणांस बरेच अवगत आहेत. त्यांचे विचार रुचीर, स्वरूप, कुमारी, मणिभूषण आणि प्रगति यांच्याबद्दलची माहिती मिळवीत होते! नव्या वाटेनें निघालेल्या नजरेला ज्याप्रमाणें नवीं नवीं दृश्यें दिसत असतात, त्याप्रमाणेंच नव्या वाटेनें निघालेल्या विचारांनाही नव्या नव्या गोष्टी उकलत असतात! प्रत्येक गोष्टीला ते नव्या विचाराची कानस लावून पाहात होते आणि अशा करण्यानें त्यांना, पुष्कळशा स्पृहणीय गोष्टींची आपण निष्कारण उपेक्षा करीत आलों

अशी जाणीव होत होती ! स्वरूपविषयीं विचार करतांनाही त्यांना असेंच कांहीं तरी वाटत होतें !

अमुक एका कुळांत जन्म हीच कुलशीलाची सनद ! मग वागणीचा कसलाही बट्ट्याबोळ असला तरी चालेल !—या असल्या अंधारांतून ते आतां उजेडांत आले होते ! रूढीच्या कजाग कल्पनांना ते आपल्या मनांतून आतां उपसून काढण्याचा प्रयत्न करीत होते; तथापि अजूनही पुष्कळशा गोष्टी त्यांच्या मनाचा घोटाळा उडवीत होत्या.

प्रगतीनें मांडलेले सडेतोड आणि सोज्ज्वल विचार, कुमारीनें मणिभूषणाची त्याच्या तोंडावर निर्भर्त्सना करतांना, आपल्याला उघडी करून दाखवलेली एक निराळीच विचारांची वाट आणि होतें आहे हें बरें नव्हे, कुलशील आणि नीतिमत्ता यांना सोडून होत आहे म्हणून वगैरे विरुद्ध गोष्टींची उठावणी देऊन, आपल्याकडून या एकंदर प्रकरणांत अडथळा करण्याचा प्रयत्न करणाऱ्या मणिभूषणांचे हेतू, या सगळ्यांचे दुवे कुठें आणि कसे सांधले जातात, हेंच गूढ त्यांना लवकर उकलेना ! निरनिराळे आभास उत्पन्न करून ह्या सगळ्या व्यक्ती, कुठल्या तरी संकटांत तर नाहींत ढकलीत आपल्याला ? आडून गल्लत करणारे या सगळ्यांचे हेतू, कुठल्या तरी एकाच ठिकाणीं तर गुरफटले नसतील ?

या आणि अशा नाना प्रकारच्या विचारांनीं त्यांची झोंप पळवलेली होती. विचारांच्या लोटाबरोबर ते आणखी किती तरी लांब वाहावत गेले असते; परंतु त्यांच्या पलीकडच्या खोलींतून कसला तरी बोलण्याचा आवाज त्यांना आल्यामुळें, त्यांच्या मनोवृत्तींना निराळाच विषय मिळाला. इतक्या अपरात्रीं मणिभूषणसारख्या सधन गृहस्थाच्या घरीं कसलीं खलबतें चालतात, हें त्यांच्या विचाराला मिळालेलें एक नवें खाद्य होतें. ते वृत्ति एकचित्त करून ऐकत होते.

" मनाला आवडणारी वस्तू सरळ उचलून लांबवावी, यांत गैर काय आहे ? " कुणी तरी विचारीत होतें.

" चांगल्याचा अभिलाष धरणं हा गुन्हा नव्हे ! " मणिभूषणचा

आवाज होता हा. " पण हा प्रकार जगाला कळला तर, सगळी अब्रू धुळीला मिळेल ना माझी ! त्याची वाट काय ? "

" उगीच घाबरतां आपण. " दुसरें कोणी तरी म्हणत होतें. " असल्या गोष्टी बाहेर येऊं देण्याचा बेजबाबदारपणा आम्ही कसा करूं ? तुमच्यासाठीं एवढंही आम्हांला करतां येत नाहीं म्हणजे काय गोष्ट आहे ! तुम्ही म्हणत असाल तर दोघींनाही उचलून आणूं एकदम ! "

कुणाविषयीं वाटाघाट चालू आहे, त्याचा उलगडा एकदम झाला आतां बाबासाहेबांना, आणि जरा वेळापूर्वी जें कोडें त्यांना सुटत नव्हतें, तें आतां आपोआपच सुटलें. मणिभूषणाची सगळी कारवाई कशासाठीं होती हें समजून आल्यानंतर, त्यांनीं सहजच त्यांचे पुढले बेत ऐकून घेतले. मणिभूषणाचें अंतरंग म्हणजे कोळशाचें अंतरंग होतें ! विचारपूर्वक कितीही उगाळीत बसल्यानें, त्यांत काय बदल होण्यासारखा होता ! जितकें अधिक उगाळावें, तितकें अधिक काळें बाहेर पडायचें !

संतापाचे दीर्घ श्वास खोलीभर पांगले होते जवळ जवळ. तसल्या त्या कभिन्न काळोखांतही बाबासाहेबांचे डोळे त्वेशानें तांबडेलाल बनून विस्तवाप्रमाणें फुललेले दिसत होते. त्यांच्या संतापाचे शब्द होऊं लागले होते मनांतल्या मनांत !

ते मनाशीं म्हणत होते, " स्वरूप रुचीरला योग्य कीं अयोग्य, हा अगदीं खेरीज प्रश्न आहे; म्हणून काय मी तिच्या नीतिमत्तेवर आणि शीलावर असा दरवडा पडून देऊं ? तिच्या शीलाची राखरांगोळी होत असतांना पाहात बसूं ? शक्य नाहीं. प्रसंगाची जाणीव होऊनही, जो स्त्रियांच्या शीलाचं रक्षण करूं शकत नाहीं, त्यानं स्वतःच्या कुलशीलाची घमेंड गाणं, हें मूर्खपणाचं आहे ! शीलाची वडेजाव गात बसण्यापेक्षां, तें संभाळण्याची जबाबदारी फार मोठी असते. या जबाबदारीची जाणीव ठेवून स्वरूप वागत असतां, तिला अशा वेळीं मदत न देण्यानें, आपल्याच कुलाचा कमीपणा होईल. "

बाबासाहेबांचे वरील विचार म्हणजे सद्‌गुणांचा विजयच नव्हे का ? ते किती सहजासहजीं सद्‌गुणांच्या आहारीं गेले पहा ! कारण सद्‌गुण

हे सदा विजयी असतात. कुलपरंपरा म्हणजे शीलपरंपरा नव्हे. आपण दुर्लक्ष करतों, त्या ठिकाणीं देखील शील असूं शकतें. आणि तें कुठेंही रुजलें तरी त्याच्या किमतींत फरक पडत नाहीं! असा ते आपल्या मनाला आतां निर्वाळा देऊन सांगत होते. जिवाच्या दौलतीचें दान, या सत्कार्याकडे ते आतां अगदीं उदारपणानें करायला सिद्ध होते.

वर दर्शविलेल्या विचारांचें ओझें वाहून नेतांना ते आतां इतके थकून गेले होते कीं त्यांचे डोळे आपोआप झांकले गेले. पहांटेच्या पहिल्या कोंबड्यानें जगाला जागवायला म्हणून आरोळी ओढली अन् त्याच वेळीं त्यांनीं आपल्या जागेपणाला विसांवा दिला.

झोंपेंतही त्यांना त्यांच्या विचारांनीं सोडलें नव्हतें, हें त्यांच्याकडे त्या स्थितींत पाहणाराला समजून आलें असतें. विचारांची सोबत जीवनाच्या समाप्तीबरोबरच समाप्त होत असते.

---

## प्रकरण २० वें

# सत्याग्रहाचे कुंडांत !

स्वातंत्र्ययुद्धांतील आकांक्षांचें प्रतीक असा जो राष्ट्रीय ध्वज, तो करारी वृत्तीनें हातांत घेऊन पहिल्या पथकाचा नायक म्हणून रुचीर चालूं लागला होता. हजारों लोक सहर्ष जयनिनादानें त्याला आशीर्वाद देऊन प्रोत्साहन देत होते. अनंत सुवासिनींनीं एकसमयावच्छेदेंकरून पहिल्या पथकाला ओवाळून, त्याचा नेता म्हणून रुचीरच्या भालप्रदेशावर कुंकुम-तिलक लाविला. कुमारी पहिल्या पथकांत सैनिक म्हणून दाखल झाली होती; परंतु तिसऱ्या पथकाची डिक्टेटर म्हणून तिच्यावर जबाबदारी टाकली गेल्यामुळें, ती आजच्या अभिनव सुखाला पारखी झाली होती. त्यामुळें तिनें आणि स्वरूपनें त्याला विनम्र होऊन निरोप दिला होता.

सरकारनेंही चळवळ दडपण्यासाठीं आटोकाट तयारी ठेवली होती; आणि त्यामुळेंच रुचीर आणखी दोन तासांनीं पराधीन होणार होता, याची जाणीव त्याला व त्यांना असल्यामुळें, आणखी आपल्या परत भेटीसाठी किती काळाचें अंतर तोडावें लागेल, या आशंकेनें ते सारेच व्यथित झाले होते; तथापि कर्तव्याची आतुरता त्यांच्या उत्साहांत व्यापकताच आणीत होती! जनसमूहांतही उत्साह कसा उसळून वाहात होता. पथकांतील सैनिकही निश्चयांच्या करारीपणानें निरोप घेऊन चालूं लागले होते. निश्चयानें निघणारा एक लोट कशानेंही परत फिरणार नाहीं, अशीच ग्वाही त्यांच्या नजरेंतून निघत होती.

झालें! आणखी थोडचा वेळांतच जंगलांतून जिकडे तिकडे कुऱ्हाड-कोयत्यांचे आवाज नाचूं लागले! जंगलाची तूट होणें, हा जसा निसर्गाचा कायदा, तसा त्याच्या कायद्याचीही तूट होण्यांत निसर्गाचाच कायदा लागू पडतो! सत्याग्रहींनीं रान भरलें अन् थोडचा वेळांतच तिथें कायद्याची हजेरी सुरू झाली.

रुचीरसह सर्व पुढारी पकडले गेले. लोकांच्या झुंडीच्या झुंडी पुढे घुसूं लागल्या. तो अनावर पूरलोट पांगवण्यासाठीं, पोलिसांच्या लाठ्या भिरभिरूं लागल्या. एकतर्फी हातघाई सुरू झाली! होणाऱ्या आघातांनीं किती तरी खोकाळीं फुटलीं! शांतिसंग्रामांतले सैनिक, चौफेर होणाऱ्या आघातांनीं दुर्बल न बनतां अधिकच नेटानें पुढें सरकत होते. आयुष्य आणि मृत्य, या दोघांची आजवर झालेली ताटातूटही त्यांना आतां असह्य झाल्या-सारखें दिसत होतें! प्रत्येक अवयवावरून होणारा वर्षाव, ते मातृभूमीसाठी बिनकदर सहन करीत होते! लाठीच्या तडाख्यांनीं डोकीं फुटत असतां कोणीही सत्याग्रही जागा सोडीत नव्हता. ते आपल्या निश्चयापासून एक रेसभरही मागें सरले नाहींत.

आणखी थोडा वेळ असाच हातघाईचा निघून गेला अन् जिकडे तिकडे जखमी सैनिकांचें आक्रंदन सुरू झालें. अवघा भूमिभाग म्हणजे दुःखाचें मुख प्रसवणारा सृष्टीचा अवशेष, असेंच वाटत होतें प्रत्येकाला तो प्रकार त्या कारुण्योत्पादक किंकाळ्यांनीं साधूंच्या हृदयांतसुद्धां त्वेष

उत्पन्न केला ! तेथील त्या भयोत्पादक दृश्यानें, मानवी मनें भेदरून जाण्या-ऐवजीं चिडून गेलीं. प्रेक्षकांतून हजारों सत्याग्रहींची जागा भरून निघाली आणि अटक, लाठीचार्ज वगैरे सर्व विधींची फिरून उजळणी झाली. या सर्व दृश्याला कंटाळूनच कीं काय कोण जाणे सविताही प्रभेसह पळून गेला अन् पृथ्वीवर दाट काळोखाचा संसार अंथरला गेला ! त्या दिवसा-पुरती त्या परिस्थितीनें विश्रांति घेतली.

याच काळोखाच्या आश्रयानें दुसऱ्या ठिकाणीं दुसरें काळें कृत्य घडत होतें ! रात्रीं बारा साडेबारा वाजले होते. रुचीरच्या अटकेनें स्वरूप सचिंत अशी खुर्चीवर पेंगुळती पडली होती. तिची ती अवस्था म्हणजे धड झोंपही नव्हे अन् धड जागही नव्हे ! ही ग्लानि होती असेंही म्हणतां आलें नसतें. कुठल्या तरी आशा वावटळींत सांपडल्यानें, मनाला आणि अवयवांना आलेली शिथिलता होती ती !

सुखाचा वाढवलेला पदर कसा ओंवावा, हीच सगळी चिंता तिच्या मनांत ओतप्रोत भरून राहिली होती; आणि त्याविषयीं विचार करतां करतांच तिची वर दर्शविल्याप्रमाणें स्थिति झाली होती. या एकच एक विचारांत तिनें आपलें चित्त गुंतवल्यामुळें, ती स्वतःसुद्धां सगळयाला विसरली होती ! तिच्या या अनवधानामुळेंच तिच्या खोलीचें दार सताड उघडें राहिलें होतें.

सहज सांपडलेल्या या संधीचा फायदा घेऊन दोन धटिंगण व्यक्ती एकदम आंत शिरल्या. त्यांच्या पदरवानें स्वरूप एकदम दचकून उभी राहिली. त्यांना पाहतांच किती तरी भयंकर कल्पना, तिच्या मनांत चांदण्यासारख्या पटापट उगवल्या ! आज उगवत्या सूर्यानें आपल्या किरणांच्या द्वारें पृथ्वीवर सगळीं संकटेंच तर फेंकलेलीं नाहींत ? आजची काळी रात्र सगळया काळया कृत्यांनींच तर सारवून ठेवलेली नाहीं ? एक ना दोन; असंख्य विचार मनांत आले अन् उडून गेले ? भीतीनें कसलाच आवाज काढतां येणें शक्य नव्हतें तिला.

तिच्या या दुबळया परिस्थितीचा फायदा, त्यांनीं पुरेपूर घ्यायचा ठरवलें होतें. एकानें झटपट पुढें होऊन तिचें तोंड दाबलें. तिनें पुष्कळ

धडपड करण्याचा प्रयत्न केला, परंतु तो निष्फळ होत होता. त्यानें तिला अगदीं सहज उचलून घेतलें आणि ते दोघे त्वरेनें दाराकडे निघाले.

इतका वेळ आडोशाला उभे राहून हा प्रकार पाहात असलेले बाबा-साहेब, आपला सोटा सरसावून एकदम पुढें झाले आणि वृद्धापकाळांत जवळ असलेली सगळी ताकद एका ठिकाणीं गोळा करून, त्यांनीं स्वरूपला घेऊन येणाऱ्या माणसाच्या डोक्यांत तडाखा हाणला. एक भेसूर किंचाळी फोडून त्यानें स्वरूपला सोडलें अन् दोघांनीं दोन सुरे परजून बाबासाहेबांच्यावर लगट केली. प्रसंगानें गोंधळलेली स्वरूप आतां एकदम शुद्धीवर आली. तिनें मोठ्यानें ओरडून गडीमाणसांना हांका मारल्या. बाबासाहेबही आवेशानें त्यांना अडवून मोठ्यानें ओरडले, "धांवा, धांवा, खून!"

एकीकडे अशा तऱ्हेनें ओरडण्याचा सपाटा सुरू असतांच त्यांनीं कसा-बसा आपला बचाव चालवला होता. आतां त्यांचा निभाव लागणेंही शक्य नव्हतें! वयाच्या मानानें थकलेलीं गात्रें आतां पार गळून गेलीं होतीं. या आकस्मिक कल्लोळानें जागीं झालेलीं गडीमाणसें आतां वरती धांवत सुटलीं होतीं. त्यांच्या चाहुलीनें त्या व्यक्ती सावध झाल्या आणि स्वतःच्या बचावासाठीं आतां पोबाराच करायला पाहिजे हें ओळखून त्यांतील एकानें क्षणावधींत बाबासाहेबांच्यावर एक तीक्ष्ण वार करून आपली वाट मोकळी करून घेतली आणि पटापट उड्या टाकून ते पसार झाले.

रक्ताच्या थारोळ्यांत वृद्ध बाबासाहेब निपचित पडले होते. होऊन गेलेल्या प्रसंगाच्या भीतीनें अजूनही स्वरूपची जीभ नीटशी उलगडत नव्हती. ती उगीचच एकसारखी त्यांच्याकडे पाहात उभी राहिली होती. भोंवती उभ्या असलेल्या सगळ्या माणसांचीही तीच अवस्था होती. वेड्याप्रमाणें एकमेकांच्या तोंडांकडे पाहून प्रसंगाची कल्पना बसवीत होते ते! काय प्रकार घडला हें कोणाच्याही लक्षांत येईना. सकारण आणि अकारण भंगलेल्या ज्याच्या त्याच्या भावना, जो तो एका ठिकाणीं गोळा करण्याचा प्रयत्न करीत होता!

सगळ्याआधीं आपले पांगलेले विचार प्रगतीनें गोळा केले. ती पुढें होऊन म्हणाली, "ताई, हा काय प्रकार आहे अन् हे कोण गृहस्थ पडले

आहेत इथं ! " असें म्हणत असतां ती बाबासाहेबांच्या जवळ गेली आणि त्यांना ओळखून अत्यंत भयभीतपणें मागें सरकत म्हणाली " अग बाई ! हे तर रुचिरांचे वडिल ! "

" अरे देवा ! " स्वरूप किंकर्तव्यमूढ होऊन उद्गारली, " हें काय झालं भलतंच ! प्रगति, दैवानं कां ग गहजब केला हा माझ्यावर ! " असें म्हणत असतां तिनें अश्रूंना मोकळी वाट करून दिली.

प्रगतीनें पुढें होऊन स्वरूपचे दोन्ही बाहुटे धरले आणि तिला गदगदा हलवून म्हटलें, " भलत्या वेळीं कसला आततताईपणा हा ! तुझ्यासारखी निपुण डॉक्टर जवळ असतां, हा वेळपर्यंत त्यांच्याकडे दुर्लक्ष व्हावें ना ! काय म्हणतील रुचीर त्यांना हें समजल्यावर ? चल आटप लवकर. "

स्वरूपनें अश्रू पुसले. डॉक्टरी धिमेपणानें ती बाबासाहेबांच्या जवळ गेली आणि तिनें त्यांची नाडी पाहिली. चेहरा एकदम प्रफुल्लित झाला तिचा. तिनें गड्यांना हुकूम करून त्यांना एका कॉटवर घेतलें. प्रगतीनें स्टोव्ह पेटवून पाणी गरम केलें. एका गड्याला दाराजवळ बसायला सांगून बाकीच्यांना जायला सांगितलें. स्वरूपनें औषधी पाण्यानें रक्त वगैरे पुसून काढून जखम मोकळी केली आणि व्यवस्थित उपचार करून बांधण केल्यावर तिनें फिरून एकदां नाडी पाहिली. अत्यंत समाधानकारक श्वास टाकला तिनें आतां.

दोघीही बहिणींनीं त्यांच्याजवळ उजाडेपर्यंत बसून राहण्याचें ठरवलें होतें.

" प्रगति, " स्वरूप हळूहळू बोलूं लागली, " माझ्यामुळं या घराण्यांत निव्वळ दुःखांचे डोंगर ओतले जाताहेत ! कशाचं सुख लागणार माझ्यामुळं यांना ! "

" मला तर हा घोटाळाच उमजत नाहीं कांहीं ! " प्रगति म्हणाली, " आहे तरी काय हा प्रकार ? "

" तें मलासुद्धां नीटसं सांगतां येणार नाहीं. " स्वरूप सांगूं लागली. तिनें आपल्या आठवणीप्रमाणें सगळी हकीकत तिला सांगितली. पुष्कळशा गोष्टींचें कोडें अजून तिलाच सुटलें नव्हतें. त्या माणसांच्या पाठोपाठ हे

कसे आले, त्यांना हा कट अगोदर समजला होता कीं काय, समजला होता तर त्यांनीं आपल्याला आधीं सूचना कां दिली नाहीं, वगैरे किती तरी प्रकारचे न सुटलेले विचार होते अजून ! समाधानाची एक स्पष्ट गोष्ट होती कीं, ते त्यांच्या संरक्षणासाठीं आले होते.

"ताई, आजचा प्रसंग निव्वळ यांच्यामुळंच निभावला. तुझा गौरव कायम राखणाऱ्या या वृद्धांसाठीं कुसलेही कष्ट पडले, तरी ते केले पाहिजेत."

"वेडी कुठली !" स्वरूप थोडेंसें हंसत म्हणाली, "प्राणाच्या मोलानं तरी हे उपकार फेडतां येतील का मला ! माझ्या डॉक्टरी ज्ञानाच सगळं रान उठवीन यांच्यासाठीं आतां !"

"ज्यांचं हृदय चांगलं, त्यांना चांगल्या गोष्टीच करतां येतात !" प्रगति म्हणाली, "यांच्यासारख्या उदार आणि कर्तव्यतत्पर माणसामुळेंच पुष्कळशा चांगल्या गोष्टींचं अस्तित्व दिसून येतं या जगांत. कांट्यावर पडून किती तरी फुलं फाटून गेलीं असतील या जगांत ! बिचारीं फुलं मेलेल्या शीलानं मातीआड झालीं असतील नाहीं तर होतील; आणि कांटे मात्र राजरोस नव्या फुलांची चीरफाड करीत जगांत संभावित म्हणून वावरत असतील ! कांट्यांच्या कडेला न जाण्याचा जग उपदेश करीत असतं; पण कांटे किती सर्वगामी असतात याचं हें उदाहरण पहा म्हणावं !"

"प्रगति, झोंप घे गडे आतां तूं !" स्वरूप मृदुपणानें म्हणाली, "विचार कधींच संपत नसतात. आपल्याला ज्या वाटेनं जायचं आहे, त्या वाटेनं चालूं लागावं ! त्या वाटेनं म्हणजे संकटं असत नाहींत असें नाहीं. त्यांचं पीक फार मोठं आहे ! तीं नसतील अशी जागाच सांपडणं कठिण ! तरी पण चांगल्याच्या निश्चयानं तीं उधळून टाकतां येतात ! कारण तिथं परमेश्वराचं साहाय्य उभं राहातं ! आज आलाच आहे हा अनुभव आपल्याला. चांगल्या इच्छांना असंख्य वाटा त्यांच्या ध्येयाच्या ठिकाणीं घेऊन जातील. बिनकाळजी जाऊन झोंप घे आतां. उठतेस ना !"

"आतां कुठली झोंप !" प्रगति म्हणाली, "पार धुऊन पुसून गेली. बसूं या कीं बोलत अशाच उजाडेपर्यंत !"

"आतां तूं ऐकणार आहेस थोडीच!" स्वरूप किंचित् स्मित करीत म्हणाली, "पण हो; बरी आठवण झाली! पहिल्यानं शैलाला फोन कर पाहूं. उद्यांच्या पथकाचं नेतृत्व तिला द्यायला पाहिजे आतां. दोन्ही जबाबदाऱ्या एकाच जिव्हाळयाच्या आहेत!"

प्रगतीनें उठून फोन केला.

---

## प्रकरण २१ वें

# सत्याग्रह तहकूब ठेवला

सत्याग्रह शिबिरांतून पहांट जाग्याचा घंटानाद सुरू झाला. प्रत्येकानें उठून लष्करी शिस्तीप्रमाणें आपलें नैमित्तिक आटोपलें. रुचीरला पकडल्याची बातमी वाचतांच वसंतही पुण्याहून येऊन सत्याग्रह शिबिरांत उतरला होता; परंतु रात्रीच्या प्रसंगामुळें, प्रगति अगर स्वरूप या दोघींनाही त्याचें आगमन माहीत नव्हतें. त्यालाही त्यांच्या भेटीला जातां आलें नाहीं. शिवाय आजच्या दिवसाचें नेतृत्व स्वरूपकडे असल्याचें त्यानें वाचलें होतें; तेव्हां त्या दोघींचीही गाठ इथें होईल, ही त्याची अपेक्षा होती.

वसंताची अपेक्षा जरी बरोबर होती, तरी प्रत्यक्ष निराळेंच दृष्टीस पडलें त्याच्या. शुभ्र वस्त्र परिधान करून अगदीं साधेपणानें सडसडीत काळेभोर केंस पाठीवर रुळत सोडलेली प्रसन्नमुख अशी शैलबाला, हातांत ध्वज घेऊन उभी होती. तो तें अपूर्व दृश्य, आश्चर्यवत् दृष्टीनें पाहात राहिला. प्रत्यक्ष राजकुमारीनें या लढयाचें पुढारीपण घ्यावें, म्हणजे जगांत कधींही न घडणारें आश्चर्य होतें त्याच्या दृष्टीनें.

"का हो," त्यानें एका स्वयंसेवकाला विचारलें, "आजच्या पथकाचं पुढारीपण स्वरूपकडे होतं ना?"

" हो. यादीवरून तसं दिसतं खरं. " त्यानें उत्तर दिलें.

" मग हा फरक कसा झाला ? " वसंतानें विचारलें.

" हा विषय सैनिकाचा नाहीं. " त्यानें उत्तर दिलें. " ध्वजवाहकाच्या पाठीमागून चालायचें आणि प्राणाचीही पर्वा न करतां स्वातंत्र्यासाठीं आणि स्वातंत्र्यध्वजासाठीं लढायचें, यापेक्षां आणखी गोष्टी लढणाऱ्या शिपायानें पाहायच्या नसतात ! ज्या वेळीं जी जबाबदारी हांक मारील, तिच्या हांकेला खांबठोक उभं राहणं हा सैनिकाचा धर्म. हुकुम से चलना, हें आमचें ब्रीदवाक्य. बरं आहे; नमस्ते ! "

इतकें विस्तृत आणि स्पष्ट उत्तर मिळाल्यानंतर, पुढें चौकशी करणें कोणालाही शक्य नव्हतें. वसंत तेथें होणाऱ्या प्रत्येक कृतीकडे, आतुर दृष्टीनें पाहात राहिला. कर्तव्याची जाणीव घेऊन, उभ्या असलेल्या त्या प्रत्येक माणसाकडे पाहून, तो स्वतःला जगांतली निरुपयोगी अडगळ म्हणून समजूं लागला होता !

पुन्हां घंटा झाली. कुमारी ध्वज मध्यें घेऊन उभी राहिली आणि सगळे स्वयंसेवक गोलाकार तिच्या भोंवतीं उभे राहून भारतगौरवाची भूपाळी म्हणूं लागले. यंत्रानें दिलेल्या गतीप्रमाणें वसंतही उठून उभा राहिला. शेवटीं 'वंदे मातरम्' या राष्ट्रगीताचे वेळीं तो स्वाभिमान-पूर्वक सहजच त्यांत मिसळून गेला.

पहिला बिगुल होतांच ओळ धरून जाण्याच्या तयारीनें सगळे उभे राहिले. दुसऱ्या बिगुलाबरोबर कुमारी ध्वजासह पुरोभागीं येऊन उभी राहिली. तिसऱ्या बिगुलाचा नाद आणि गगनभेदी जयनिनाद, यांतील स्फूर्तीसह ते आतां कूच करणार तोंच अग्रभागीं असणाऱ्या कुमारीच्या हातांत, सरकारी शिपायानें एक सीलबंद लखोटा आणून दिला. एक रती-भरही मागे न फिरतां, तिनें उभ्यानेंच तो फोडून वाचला. वाचन होतांच तिनें आपल्या हातांतला झेंडा सहर्ष उंच केला. त्याबरोबर सर्वांनीं जयघोष केला.

ती सर्वांना उद्देशून म्हणाली,

"भाईहो,

संग्रामाला सुरुवात होते न होते तोंच युद्धतहकुबीचा समय येऊन उभा राहिला आहे. अर्थात् तहकुबी म्हणजे समाप्ति नव्हे. ज्या आपल्या प्राथमिक अटी फेंटाळून लावल्या होत्या आणि ज्यामुळें आपल्याला ही मोहीम हातीं घ्यावी लागली, त्या सर्व अटी आतां मान्य केल्या आहेत, असें आतां दरबारकडून कळविण्यांत आलें आहे; पण पुष्कळच नवी परिस्थिति आतां निर्माण झाली आहे. कालच्या अटींत आणखी एका अटीची आतां भर पडली आहे. काल पकडलेल्या सर्व लोकांची बिनशर्त मुक्तता, हीच ती अट होय. त्यासाठीं दरबारला सवलत देणं जरूर आहे. यासाठीं मी असें जाहीर करतें कीं, आणखी अठ्ठेचाळीस तास ही मोहीम तहकूब ठेवण्यांत येत आहे. दरम्यान आपले सर्व लोक आपल्यांत येऊन मिसळतील आणि हें काळ्या मेघपंक्तींनीं गजबजलेलें आकाश स्वच्छ होईल, अशी आशा आपण व्यक्त करूं या!"

अंबराला भेदून जाणाऱ्या जयनिनादांत ते सगळे सैनिक परत शिबिरांत शिरले.

शिबिरांत सर्व ठिकाणीं स्वतः फिरून कुमारी स्वयंसेवकांची सोय बसवीत होती. जेवण व्हायला सहजच बारा वाजणार होते आतां; म्हणून सात आठ पोतीं चुरमुरे वगैरे आणवून ठेवले होते. त्यांतील कांहीं तिनें पांच पांच सहा सहांच्या टोळ्यांतून वांटून दिले.

युद्धाच्या धामधुमींत क्षणाची फुरसत म्हणजेच सबंध आयुष्य! तेवढ्या वेळांत आधाशीपणानें मिळेल तेवढी करमणूक आणि चैन करून घ्यायची! जवळ जवळ तोच प्रकार इथें चालू होता. शिबिरांतून बाहेर पडतांना, प्रत्येक मन आपण परत येणार नाहीं या निश्चयानें बाहेर पडत होतें. संध्याकाळीं आपण परत येतांना, यांतील बऱ्याच जणांना हरवून येणार आहोंत, कदाचित् त्या संख्येंतच आपणही असूं. अशा भावनेनें प्रत्येक जण एकमेकांवर मनःपूर्वक प्रेम करीत असे. कुमारीही याला अपवाद नव्हती. देशाभिमानी सैनिकाच्या भालप्रदेशावरून, त्या रखरखीत

उन्हातान्हांतल्या कष्टानें वाहाणाऱ्या एका एका घर्मबिंदूचें मोल, कोटयवधि निरर्थक मानवी अडगळीपेक्षां अधिक होतें. कुमारी त्यांना कशी विसरणार ? तिनें सर्वांचा प्रेमपूर्वक परामर्ष घेऊन मगच तेथून गमन केलें. स्वरूपकडे जाण्यासाठीं तिचें मन बागडतच पळत होतें.

तिकडे सत्याग्रहतहकुबीची धांदल चालू असतां, इकडे स्वरूप बाबासाहेबांच्या जवळ बसून राहिली होती. तिकडच्या हकीकतीची उत्कंठा मात्र तिला अस्वस्थ करीत होती, कारण आतां बाबासाहेबांच्या प्रकृतीविषयीं काळजी करण्याचें कारण उरलेलें नव्हतें.

बाबासाहेब शुद्धीवर आले होते तरी त्यांना परिस्थितीचें ज्ञान झालें नव्हतें. ते उघडया डोळयांनीं जणुं काय आपली हरवलेली स्मृतीच शोधीत होते. "आई ग आई !" एवढयाच करुण विव्हळण्यानें त्यांनीं आपल्या संवेदनांचें विवरण केलें होतें आणि तेवढयावरूनच स्वरूपच्या आशा उमलल्या होत्या. तिनें थोडें दूध गरम करून चमच्यानें हळूहळू त्यांना घातलें. तेवढयानें म्हाताऱ्याच्या काळवंडलेल्या मुखावर तजेला दिसूं लागला. वेळच्या वेळीं आपलेपणानें होणारे उपचार अयशस्वी कसे होतील ? आणखीन् बऱ्याच वेळानें बाबासाहेब शुद्धीवर येऊन कण्हत म्हणाले, "कुठं आहें मी ! काय होतं आहे मला !"

"आपण कीं नाहीं आपल्याच माणसांत आहांत." स्वरूप स्निग्धपणें म्हणाली, "शांत पडून राहा हं ! लवकरच बरं वाटेल आपल्याला."

"पण मला होतं आहे तरी काय ?" त्यांच्या खोल आवाजांत एक प्रकारची उत्सुकतेची तीव्रता होती.

"आतांच कांहीं घाई का आहे तें समजण्याची !" तिनें जरा कोमल जरब दिली, "जरा बरं वाटतं आहे आपल्याला, मग समजेल सगळं कांहीं. जरा स्वस्थ पडून राहा पाहूं आतां !" रोग्याच्या काळजीसाठीं वापरलेली कठोरता होती तिच्या आवाजांत.

इतकें स्पष्ट आणि हलक्या हाताचें सणसणीत इंजेक्शन मिळाल्यानंतर, कसलाही वैतागी वीर असला, तरी तो काय करणार ? ते मुकाटयानें पडून राहिले; तथापि कपाळावरील आंठयांनीं त्यांची उच्छृंखल तळमळ

आंखून दाखवलीच ! तें पाहून तसल्याही परिस्थितींत स्वरूपला हंसें आलें. तें तिनें तोंड एका बाजूला करून झुगारून दिलें !

स्वरूपनें डोस तयार करून त्यांना दिला आणि ती हातांत मासिकाचा अंक घेऊन एका आरामखुर्चीवर बसूं लागली, तोंच बाहेर वर्तमानपत्र विकणारा पोऱ्या ओरडला, "जादा अंक ! सत्याग्रह ! सत्याग्रह संग्राम तहकूब !" आणि आणखी पुष्कळच.

स्वरूप आश्चर्यानें अगदीं मूढ बनून गेली. काल सुरू झालेला सत्याग्रह आज लगेच तहकूब ! घोटाळाच उमजेना तिला हा. "कुमारीचें नेतृत्व कुणाला तरी... फार करून लोकपक्षालाच अपशकून तर... पण छे !" कोणचीच शंका कायम घर करून राहीना तिच्या मनांत. पण फार वेळ तिला तिष्ठत बसावें लागलें नाहीं. प्रगति हातांत जादा अंक घेऊन आनंदातिरेकानें एकदम आंत आली.

"ताई, तडजोडीच्या पहिल्या अटी मान्य झाल्या. आज दोन वाजतांच सुटणार आहेत सगळे लोक. रुचीरांना घ्यायला कुमारी जाणार आहे म्हणे ! आरंभ आणि शेवट किती जवळ जवळ उभे होते नाहीं !" हें सांगत असतां तिचा आनंद जवळ जवळ ओसंडून वाहात होता. जणूं काय तडजोडीची थाळी, अपेक्षित आशांनीं तोंड वर भरून रुचीरच्या हवालीं झाली होती. उमाप मुठींनीं आनंद उधळायला सुरुवात केली होती तिनें !

"भूकंपाचं भाग्य चांगल्या गोष्टींच्याच नशिबीं येतं लवकर लवकर !" स्वरूप जादा अंक हातांत घेतां घेतां म्हणाली, "एवढ्यावरच समाधान गोळा नाहीं झालं ! अजून केवढं तरी अंतर कापायचं आहे ! राजकारणाची हवा फार लवकर लवकर बदलत असते ! आतां झालेली तडजोड आणखीन् कांहीं क्षणांनीं विरघळणं, हा सहजसंप्रदाय आहे दरबारचा !" असें म्हणत म्हणतच तिनें हातांतल्या वर्तमानपत्रांत नजर ओतली.

"फारच सुंदर अॅक्शनस् घेतल्या आहेत या वेळीं कुमारीनं !" तिनें त्या विस्तृत बातमीवरून काढलेलें अनमान मोठ्या अभिमानानें बोलून दाखवलें, "तात्पुरती तहकुबी जाहीर करून, तिनं मांडलेल्या पटांतील

एकही मोहोरं, प्यादं मागं पुढं न घेतां, डाव कसा राखून ठेवला आहे. अभिनंदन केलं पाहिजे तिचं या मुत्सद्दीपणाबद्दल ! "

विशेष योगायोग असा कीं, त्याच वेळीं कुमारी येऊन हंसतमुखानें दारांत उभी राहिली होती. ती पुढें होऊन स्वरूपचे दोन्ही हात दोन हातांत घेऊन लडिवाळपणानं म्हणाली, " तुझे प्रेमळ आशीर्वाद म्हणजेच या कुमारीचं जीवन ! तान्हेल्या चातकाप्रमाणं माझी तहान सदांच शोषलेली आहे या बाबतींत ! "

सलील हास्य करीत स्वरूपनें स्वतःचे हात सोडवून घेतले आणि तिच्या गालावर एक गोड चापट मारून ती म्हणाली, " भारीच खट्याळ मुलगी आहेस तूं ; मला काय माहीत नाहीं वाटतं ! फूल चांगलं आहे असं म्हणणं, म्हणजे त्याला आत्मसात् करण्याची तयारीच आहे असं समजायला पाहिजे ! "

" नाहीं तरी घेणारच आहें तुझ्या जवळचे सद्गुण तोडून ! " कुमारी सहास्य मुद्रेनें म्हणाली.

किलकिल्या डोळ्यांनीं म्हातारा या अकृत्रिम दृश्याचें आकंठ पान करीत होता ! औषधानें म्हाताऱ्याच्या डोळ्यांवर भरपूर झोंप घातलेली आहे, ही स्वरूपची कल्पना विस्कळित होण्याचें खरोखरच कांहीं कारण नव्हतें आणि त्यामुळेंच त्या कांहींशा निःसंकोच वृत्तीनें खेळत बागडत बोलत होत्या; परंतु तें दृश्य पाहण्याचें भाग्य परमेश्वरानें बाबासाहेबांच्या वांट्याला घातलें होतें आणि म्हणूनच ते अपेक्षेपेक्षां लवकर जागे झाले होते.

स्वरूपचा गुणगौरव हाच त्यांच्या हृदयाचा आनंद होऊं पाहात होता. निष्पाप मन गुणांचें वेंचक असतें एवढें खरें. त्यांचें मन आतां जातपात आणि आदल्या पिढीचा धंदा पाहात नव्हतें. ते स्वरूप, प्रगति यांना, उकिरड्यावर वाढलेलीं रत्नें मानीत होते. ' मालेंतलें प्रत्येक रत्न जितकें मोलाचें नि आदरणीय असतें, तितकेच व्यक्तींचे सद्गुणही मोलाचे अतएव आदरणीय असतात ! सुंदर सद्गुणांवर मनष्यानें आपल्या कोत्या, खोडसाळ आणि तुटपुंज्या बुद्धीचे डाग पाडू नयेत हेंच चांगलें ! " अशा किती तरी विचारांना ते मनांतल्या मनांत गोंवीत होते.

" पिढ्यान् पिढ्या नांवाजलेल्या एकाद्या कुलांत काय कमी उकिरडा

असतो ! " बाबासाहेब स्वरूपसंबंधानें विचार करतांना, अलीकडे नेहमीं हा प्रश्न स्वतःला करीत असत.

" आपलं मन जर प्रामाणिकपणानं चांगल्याचा अभिलाष धरतं, तर त्याचं क्षेत्र आकुंचित करून कसं चालेल ? " पुन्हां ते आपल्या मनाला विचारीत.

" विधात्यानं वाढवलेल्या एवढ्या विस्तृत जगांत, सद्‌गुणाचं साम्राज्य मुठींत मावणारं कसं असूं शकेल ? " त्यांच्या जाग्या मनाचा हा विचार होता.

" परमेश्वरानं वसुंधरेवर अगणित मुठींनीं रत्नं उधळलेलीं आहेत. तीं जेथें पडलीं असतील तेथून वेंचून काढण्यासाठीं वेंचक बुद्धि माणसाला दिलेली आहे. तीं जिथें जिथ सांडलेलीं ... पडलेलीं ... जन्मलेलीं असतील, तेथून गोळा करून आणून त्यांच्या गुणांचें चीज करणें, हें मानवी बुद्धीच्या वांट्याला घातलेलं कर्तव्य आहे ! मग तें स्थळ बरं अगर वाईट, हें पाहण्याचं कारणच कुठं उरतं ? "

एकंदरींत त्यांची आतांची विचारप्रणाली अशा तऱ्हेची होती. त्यांचें प्रामाणिक मन किती तरी तऱ्हेच्या सात्त्विक आणि योग्य अशा विचारांच्या प्रदेशांतून त्यांना फिरवून आणायला तयार होतं; पण आतां या उतार वयांत इतका अफाट प्रवास होणें शक्य नव्हतें म्हणूनच कीं काय कोण जाणे, कुमारीच्या मनमोकळ्या अशा दीर्घ हास्यानें त्यांच्या प्रवासाची पुढची वाट पार पुसून गेली ! ते भावनाविवश होऊन त्यांचा पुढील संवाद ऐकूं लागले.

" कशी काय आहे यांची तब्येत आतां ? " शैलाचा बाबासाहेबांच्या प्रकृतीबद्दल प्रश्न होता हा.

" पुष्कळच बरी आहे. "

" नुसत्या तुझ्या शब्दानं रोग बरे होतील ! मग औषधानं उतार दिल्याचं काय नवल ! " कुमारीचें भावनाप्रधान उत्तर होतें हें.

" वेडे मुली, " तरळ स्मित करीत स्वरूप बोलूं लागली, " माणसाला भलतंच महत्त्व देण्यानं परमेश्वराचा अपमान होतो एकादे वेळीं ! "

" काय तरी बाई बोलणं हें ! " तिला खोडून काढण्यासाठीं राजकन्या म्हणाली, " हें आपलं कांहींतरीच तुझं ! दात्याचं दातृत्व याचकाच्या

वैभवानं वितळतं वाटतं ? दाता कधीं स्वार्थी नसतो. त्यानं तुझ्यांत ओतलेले सद्‌गण काय झांकून ठेवण्यासाठीं ओतलेत ? जें जगाला दिसूं नये असं त्याला वाटत असेल, तें त्यानं निर्माणही केलं नसेल ! त्याच्या इच्छेचा तुमच्या सोयीप्रमाणं अर्थ बसवतां वाटतं ! "

"ताई," प्रगति हंसत म्हणाली, "वीत वीत जाडीचा काळा बुरखा पांघरून घे आतां; म्हणजे या खट कुमारीची दृष्ट नाहीं लागणार तुला !"

"अहा ग ! कांहींसुद्धां समजत नाहीं तुला !" मानेला एक रम्य हिसडा देत राजकुमारीनें शेरा मारला, "आपलेपणाची नजर भारी तिखट अन् बोंचरी असते ! तिला लोखंडाचा बुरखादेखील प्रतिबंध करूं शकणार नाहीं. अणुरेणूच्या सूक्ष्म आत्म्यानं ती वाटेल त्या दुनियेंत वांवरत असते !"

"ए प्रगति," स्वरूप स्वतःचें मुखोत्पल रम्य हास्यानें विकसवीत म्हणाली, "चांगला दोन कप चहा ओत आणून तिच्या घशांत ! त्याखेरीज हिची स्तुतेरी बंद नाहीं व्हायची !"

तिघीही थोडचाशा मनमोकळेपणानें हंसल्या. त्या वृद्धाला आतां आपलें समाधान आणि आनंद कोंडून ठेवणें अशक्य झालें. त्यांनीं थोडेसें खोकून आपल्या जागेपणाची जाणीव दिली. स्वरूप चटकन् कुमारीसह त्यांच्या जवळ गेली.

"बरं वाटतं आहे ना आतां ?" तिनें हळुवारपणें विचारलें.

"हो, पुष्कळच बरं वाटतं आहे. फारच तखलीफ पडली माझ्यासाठीं तुम्हांला !" त्यांनीं मनःपूर्वक उद्‌गार काढले हे.

"हेंच बोलायचं होतं वाटतं तुम्हांला मघांपासून ! किती गोणी पाहिजे आहेत तुम्हांला हे उपकार भरून ठेवण्यासाठीं !" कुमारीनें विनोदानें म्हटलें; पण तिनें त्यांतही आपला विनय सोडला नाहीं.

"मी थट्टा नाहीं करीत ! मनापासून बोलतों आहें अगदीं !" ते फिरून म्हणाले.

"तुम्ही मनापासून जरी बोलत असलां, तरी तें मनावर घ्यावंसं वाटत नाहीं आम्हांला !" प्रगतीनें हास्य करीत उत्तर दिलें.

"स्वतःचा जीव धोक्यांत देऊन स्वरूपचा बचाव केलात तुम्हीं. तेव्हां

खरे कुणीं कुणाचे उपकार मानायचे ?" कुमारीनें आपली आदरदृष्टि त्यांच्याकडे लावून विचारलें.

"त्यांत काय मीं मोठसं केलं आहे ! तें जाणतेपणाचं कर्तव्यच होतं." त्यांनीं उत्तर दिलें, "सहज सुगावा मिळाला म्हणून तेवढं करतां आलं. आतां जीव धोक्यांत देण्याचं म्हणालांत तुम्ही; पण मी माझ्या तरुणपणांत-देखील असल्या वेळीं जिवाचे लाड केले नाहींत. आतां तर काय, अखेरच आहे सगळी ! कसल्या तरी दुखण्याचं निमित्त होण्यापेक्षां, असल्या सत्कार्याचं निमित्त होणं काय वाईट ?"

"एकूण तुमचं म्हणणं असंच कीं नाहीं, कीं, ज्यानं त्यानं आपलं कर्तव्य करीत असावं ?" स्वरूपनें विचारलें. आणि बाबासाहेबांनीं त्याला निवळ हंसून होकार दर्शविला. त्यावरून ती पुढें म्हणाली, "मग सरलाच आहे विषय. तुमचं कर्तव्य तुम्हीं केलंत, माझं मीं केलं. आतां उपकार अनुपकाराची बेरीज-वजाबाकी हवी आहे कशाला ?"

स्वरूपच्या सौजन्यानें बाबासाहेबांवर मात केली म्हणून कुमारीला आनंद वाटला आणि विषादही वाटला ! ती दूर एका खिडकीशीं जाऊन, तेथून दृष्टीनें सडकेवरचे देखावे मोजीत उभी राहिली. बोलतां बोलतां स्वरूपच्या डोक्यांत कांहीं तरी विचार येऊन तिनें तिला हांक मारली; पण तिला उत्तर मिळालें नाहीं. तिनें फिरून साथ घातली, "शैल, ए शैला !" शेवटीं तिनें उंचावलेल्या जराशा वरच्या स्वरामुळें ती एकदम चमकून भानावर आली आणि हंसत हंसत तिच्याजवळ येऊन म्हणाली, "अं ! काय म्हणतेस ! झालं का बोलून तुमचं ?"

"कुठल्या तरी विचारांकडं, कान गहाण टाकले होतेस वाटतं इतका वेळ ?" स्वरूपनें मनोहर हास्य करीत विचारलें, "इश्श ! तीन हातां-वरची हांक ऐकूं येईना, इतके तर मुलीचे कान तिखट ! कसले विचार गोळा करीत होतीस एवढे !"

"विचार नव्हतें करीत कांहीं. माझ्या ताईच्या गुणांचं वैभव मोजीत होतें ! अन् तेंही जमेना तेव्हां डोळे मिटून तुला पाहात होतें !"

" शर्थ झाली आतां तुझ्यापुढं ! " स्वरूप उसना कोप गोळा करीत म्हणाली, " उघडचा डोळ्यानं मी दिसत नव्हतें वाटतं ! "

आणखी कांहीं तरी गंमत करणार होती कुमारी; पण तें ओळखून स्वरूप तिला म्हणाली, " कांहीं बोलूं नकोस आतां. आजच्या दिवस आपला मुक्काम इथंच पडूं द्यावा ! मी स्नान उरकून येतें तोंवर या मासिकाचं मन उचकटीत बसा इथं ! प्रगतीबरोबर चहा देतें हो पाठवून ! "

त्या दोघीही हंसल्या आणि बाबासाहेबही हंसले ! स्वरूप निघून गेली, " माझ्याबद्दलची ओळख दिलीत वाटतं तुम्हीं यांना ? " त्यांनीं कुमारीला विचारलें.

" हं ! कां बरं ? कळवायचं नव्हतं वाटतं ! "

" नाहीं; तसं कांहीं नाहीं ! मला वाटलं अजून तुम्हीं कळवलं नसेल. "

" माझ्या बाई मनांतच नाहीं आलं असं कांहीं ! ओघावारी गोष्ट निघाली अन् मीं सांगूनही टाकलं हे अमुक गृहस्थ आहेत म्हणून ! "

" त्यांत म्हणजे कांहीं बिघडलं आहे असं नाहीं ! पण म्हटलं विचारून ठेवावं तुम्हांला. नाहीं तर निराळीच गंमत व्हायची एकादी. एकमेकांची ओळख होऊनही उगीच बोलण्याचालण्यांत लपंडाव राहायचा ! " थोडेंसें हास्य करीत त्यांनीं विसांवा मिळवला कांहींसा. " माझ्या या दुखण्याबद्दल आमच्या घरीं नाहीं कळवलं वाटतं यांनीं कांहीं ? " त्यांनीं पहिला विषय मधेंच तोडून दुसरा सुरू केला.

" घरीं कळवायचं खरं; पण पुरेशी कोणतीच माहिती नसल्यामुळं तें जमलं नाहीं. तुमच्या पुण्याच्या मुलाला मात्र कांहीं तरी कळवलं आहे त्यांनीं; पण त्यांचं येणंही नाहीं आणि उत्तरही नाहीं. बरं रुचीरना कळवायचं, तर तेंही शक्य नाहीं. "

" तें मला माहीत आहे. एका रात्रींत एक महिन्याचा दुखणेकरी झालों आहें मी. आजचं काय वर्तमान आहे ? रुचीरला जामिनावर नाहीं वाटतं सोडला ! "

" तडजोड होऊन चळवळ तहकूब राहिली आहे. रुचिरांच्यासुद्धां सर्वांचीच बिनशर्त मुक्तता होणार आहे आज. "

"अजबच आहे म्हणायचं सगळं ! हेंच आधीं झालं असतं तर? पण मग सत्तेचं शहाणपण कुठून दिसलं असतं ? चला, बरं झालं एकंदरींत. रुचीर केव्हां येणार आहे म्हणालांत ? "

"आतां दोन वाजतां सुटणार आहेत ते ! " कुमारीनें सांगितलें.

"चांगला असतों तर त्याला घ्यायला गेलों असतों ! " ते खिन्नपणें म्हणाले, "पण आतां काय त्याचं ? निदान महिनाभर तरी पडून राहायला पाहिजे. "

"तरी बरं थोड्यावर निभावलं म्हणून ! प्रथम तर स्वरूपसुद्धां घाबरून गेली होती. प्रत्यक्ष जखम पाहीपर्यंत जीव थाऱ्यावर नव्हता तिचा. आतां कसली आली आहे काळजी ! तुम्ही इथल्या इथं आतांदेखील उठूं बसूं शकतां. अकस्मात् बसलेला मार आणि भरपूर रक्तस्राव, याचमुळं शुद्ध गेली होती तुमची. तशी जखम कांहीं विशेष स्वरूपाची नाहीं आहे. "

इतक्यांत प्रगति चहा घेऊन आल्यामुळें तें संभाषण तितक्यावरच थांबलें.

---

## प्रकरण २२ वें

# स्वातंत्र्य-सदनाच्या दारांत

कुसलाच पद्धतशीर खटला रुचीर वगैरे लोकांवर भरून चाललेला नव्हता; त्यामुळें ते अजून कच्चे कदी होते. तथापि त्यांना मुख्य जेलमध्येंच ठेवलें होतें. अजून त्यांना सुटायला एक तासावर अवधि होता. त्यांच्या सुटकेविषयींची बातमी सर्वत्र पसरल्यामुळें, तुरुंगाच्या दाराजवळ भरपूर गर्दी जमली होती. जणूं काय, आंत कोंडून राहिलेलें स्वातंत्र्य बाहेर घेण्यासाठींच सगळे गोळा झाले होते तिथं.

कोणत्याही गोष्टीच्या परमावधीनंतर परिस्थिति बदलली जाते. दुःखांची कडेलोट सीमा म्हणजे सुखाच्या सुरुवातीचा काळ आणि वैभवाचा

अतिरेक म्हणजे दारिद्र्याचा आरंभसुमार ! त्याचप्रमाणें देशाभिमानी देहांचे कष्ट, म्हणजे देशाच्या उज्ज्वल भाग्याची अभिनव सुरुवात होय ! देशाला बंधनांतून मोकळें करायचें, म्हणजे कांहीं काळ तीं बंधनें, स्वतःच्या हातापायांत वागवायला पाहिजेत ! स्वातंत्र्यसदनांत,—हो स्वातंत्र्य-सदनच तर काय ! सगळे हाल आत्मसात् करण्याचें सामर्थ्य जिथें मिळवतां यतें, त्याला स्वातंत्र्य-सदनच म्हणायला पाहिजे !...मातृभूमीसाठीं जे सक्तमजुरीचे उपचार केले जातात, तेच पुढच्या स्वातंत्र्य-वैभवाचे वाटाड्ये असतात ! तुरुंगाच्या दारांतूनच आपल्या ध्येय-वाटेला सुरुवात होते ! कंसाचें काळें राज्य संपवण्यासाठीं त्याच्याच तुरुंगांत श्रीकृष्णानें जन्म घेतला. याचा अर्थच असा कीं, कोणत्याही गोष्टीची परमावधि होऊं देण्यासाठीं हे उपचार जरूर आहेत.

आज रुचीर तुरुंगांतून एका रात्रीच्या अनुभवासह परत येत होता. त्याच्याबरोबर त्याच्या आधीं गेलेले प्रजासभेचे कार्यकर्ते परत येणार होते. जणू काय स्वातंत्र्य घेऊन येण्यासाठींच रुचीर तिथें गेला होता ! स्वातंत्र्य-देवतेसह परत येणाऱ्या वीरवरांचें स्वागत करायला असंख्य हृदयांनीं जमा व्हावें हें निसर्गाला धरूनच आहे.

असंख्य हार रुचीरची आणि त्याच्या सहकाऱ्यांची वाट पाहात होते. कुमारी स्वतः मोटर घेऊन हजर होती. स्वरूप आणि प्रगति याही होत्याच तिच्याबरोबर. अपरिमित आनंदानें अवघें वातावरण कसें गच्च झालें होतें ! वसंतही तुरुंगाच्या महाद्वाराकडे टक लावून पाहात उभा होता त्या गर्दींत. त्याचें इकडे तिकडे लक्षच नव्हतें मुळीं. सगळ्यांआधीं प्रगतीनें पाहिलें त्याला.

"अग बाई ! हेही पण आले आहेत म्हणायचे आज !" प्रगति अत्यंत आश्चर्यानें म्हणाली.

"इश्श !" शैला उद्गारली, "अंगांत भूत भरल्यासारखं काय करतेस अशी ? कोणीसुद्धां नवखं दिसत नाहीं मला आजच्या समुदायांत !"

"तुला नाहींच दिसणार आंतां दुसरं कांहीं !" प्रगति खटयाळ-पणानें म्हणाली, "ते बघ !" तिनें वसंताकडे बोट दाखवून म्हटलें, "ते ओळखीचे आहेत गृहस्थ तुझ्या ?"

"त्यांचं नांव गांव जरी माहीत नाहीं, तरी माझ्या पथकांतले एक स्वयंसेवक म्हणून मी ओळखतें त्यांना." वसंतकडे पाहात तिनें उत्तर दिलें.

"काय ! " स्वरूप आश्चर्यानें म्हणाली, "ते तुझ्या पथकांत होते ? किती विचित्र योगायोग आहे हा ! एक सरकारी पाहुणचारांत गुंतल्यामुळं वडिलांच्या समाचारासाठीं येऊं शकले नाहींत अन् दुसरे गांवांत असून त्यांना कांहीं माहीत नाहीं. ताबडतोब निघून या म्हणून पाठवलेली तार, वाट चालत असतांच हे इकडच्या वाटेला लागल्याचें दिसतें. तार कॉलेजच्या खोलीवरून परत फिरली असेल ! "

"म्हणजे ?" कुमारीनें विचारलें "हे...!"

"रुचिरांचे धाकटे बंधु. . . . वसंतराव." स्वरूपनें तिचें वाक्य संपविलें.

"मला ग काय माहीत हें ! मीं तेव्हांच त्यांना सगळी हकीकत सांगितली असती." कुमारीनें ओशाळून म्हटलें.

"माहितीवांचून तूं तरी काय करणार ? " स्वरूपनें तिची समजूत घातली.

"शोफरला पाठवून बोलवूं या का त्यांना ? " कुमारीनें स्वरूपला विचारलें.

प्रगतीची इच्छा स्वतः जाऊन त्याला घेऊन येण्याची होती. स्वरूपनें तें ओळखलेंही होतें; परंतु पूर्ण विचारानें तिनें तिकडे दुर्लक्ष केलें आणि तिनें कुमारीला होकार दिला. शोफर गेल्यावर ती त्या दोघींना म्हणाली, "आतांच्या आनंदांत कांहीं बोलूं नका त्यांना. जातांना बरोबरच घेऊन जाऊं त्यांना म्हणजे झालं ! त्यांच्या प्रकृतीची बहुतेक काळजी मावळलीच आहे आतां; तेव्हां जरा वेळ गप्प राहिल्यानं कांहीं बिघडणार नाहीं विशेष ! "

"काय पण अगदीं ! " वसंत जवळ येतांच थोडीशी तिरपी मान करीत प्रगति त्याला म्हणाली, "केव्हां आलांत तेंसुद्धां कळवलं नाहींत ना आम्हांला ! "

"चुकलं खरं माझं; पण फुरसतच मिळाली नाहीं." वसंत स्वरूप आणि कुमारीला प्रणाम करीत म्हणाला, "काल दुपारीं दोन वाजतां दादांना पकडल्याची तार मिळाली मला. ताबडतोब निघून आलों मी."

"विठूदेखील बोलला नाहीं तुम्हीं आल्याचें." स्वरूप म्हणाली.

"त्यालाच कुठं माहीत आहे मीं आल्याचें?" बारीक बारीक स्मिताच्या रेषा उमटवीत वसंत म्हणाला.

"काल आलों तो शिबिरांतच उतरायला गेलों." तो पुढें म्हणाला.

"असं होय!" प्रगति मान वेळावीत हंसून उद्‌गारली, "कॉलेज-मध्यें वाटाणेच वाटून आलांत म्हणायचें मग!"

"असंच कांहीं नाहीं; पण कदाचित् तसं झालं असतं!" त्यानें प्रत्युत्तर केलें, "त्या बाबतींतल्या आमच्या आशा, तूर्तास तरी मनांतल्या मनांत जळून बसल्या आहेत."

हें म्हणत असतां त्याची नजर आणि तिच्या पाठोपाठ त्याचे पाय महाद्वाराकडे धांवतच गेले. पहारेकरी गजाचें भलें मोठे खंबीर कवाड उघडून रुचीर वगैरे लोकांना निरोप देत होते. जनसंमर्दांतून निघालेली आनंदाची आरोळी दशदिशा व्यापून गेली. अत्यंत त्वरेनें तिघीही तिकडे गेल्या. रुचीरचें लक्ष यांच्याकडे जातांच, तो सगळ्यांना नम्रपणें नमस्कार करीत, निकडीनें त्यांच्याजवळ येऊन उभा राहिला. कुमारीनें काढून दिलेला हार स्वरूपनें त्याच्या गळ्यांत घातला.

हारांतील फुलांप्रमाणें, आपलीं दोघांचींही सुखदुःखें एका ठिकाणीं गुंफलेलीं आहेत, याची जाणीव दोघांनाही या वेळीं होऊन त्यांनीं एकमेकांकडे पाहिलें. उदारहृदयी कुमारीच्या मलूल आशा, त्यांच्या समाधानानें हंसण्याचा प्रयत्न करीत होत्या! या वेळीं ती आपल्या स्वतःच्या भावना फार जपून वापरीत होती! सर्वांतर्फेचा हार तिलाच घालावयाचा होता. तो घालतांना तिचें मन कावरेंबावरें झालें होतें! तिनें व्यक्त केलेला तो आनंद म्हणजे निराश अंतःकरणानें केलेला जुलुमाचा रामराम होता! कोरड्या धारेनें अभिषेक करणें शक्यच नव्हतें तिला!

मोडलेली केळ खांबाला टेकून उभी ठेवावी, त्याप्रमाणें ती आपलें हृदय आंवरीत होती, सांवरीत होती, स्थिर करीत होती! मोडलेल्या भावनांचा, विस्कटलेल्या विचारांचा आणि बिन फुललेल्या मनाचा मोडका बाजार, ती कसा तरी सजवीत होती! अपुऱ्या आशांना पुरतें समाधान

कुठून मिळणार ? अर्ध्यामुर्ध्या उमलत्या वाटेवरून माघारी फिरणारें त्यांचें आयुष्य ! अपुऱ्या समाधानांतच मिटणार म्हणायचें !

स्वरूपनें तिच्याकडे पाहिलें; आणि पाहातच राहिली ती जरा वेळ ! तें पाहून कुमारीनें भरले डोळे कोरडे केले ! आणि कांहींच झालें नाहीं असा आव आणून ती परत त्या आनंदांत विलीन झाली. रुचीरला जाणीवच नव्हती कशाची. त्याच्या मुखावर नेहमींचें हास्य विलसत होतें. तो मधुर स्मित करीत म्हणाला, " फारच लवकर ओढून आणलात आजचा आनंद ! राजकुमारीच्या कौशल्याचा विजय आहे हा ! "

" माझी पूजाबिजा बांधायचा बेत नाहीं ना ठरवून आलांत आंतून ? " कुमारीनें सहज स्मित छेडीत विचारलें. तिचें तें हास्य पाहणाराला तिच्या मनोविजयाचें कौतुकच करावेंसें वाटलें असतें. क्षणावधींत आपलें मन आटोक्यांत घेणाऱ्या कुमारीकडे, स्वरूपसुद्धां पाहातच राहिली आश्चर्यानें.

" म्हणजे सगळ्यांना जाहीर आमंत्रण तरी द्यायला इथल्या इथं ! " शैलानें आपलें बोलणें संपविलें.

" राजकुमारीची पूजा, घरच्या माणसांनीं पुरेपूर बांधली असेल कीं या उपद्व्यापांत पडल्याबद्दल ! " रुचीरनें विनोद केला.

" बरं ! " ती रुसकेपणानें मानेला एक लचक देत म्हणाली, " बांधूं देत माझी पूजा घरचीं माणसें. तुम्हांला तर समाधान वाटलं त्यामुळं ! "

" शैला, सुंदर जागा शोधून काढलीस हं भांडायला ! " स्वरूप हळूच तिच्या जवळ जाऊन म्हणाली.

" ताई, " प्रगति हंसत म्हणाली, " आटोपशीर जिभेचीं माणसं आहेत दोन्हीही. बोलूं दे बिचाऱ्यांना ! "

अन् सगळींच एकसमयावच्छेदेंकरून हंसलीं. इतक्यांत सगळ्या लोकांनीं त्यांच्याभोंवतीं कडें केलें. तें पाहून स्वरूप रुचीरला उद्देशून म्हणाली, " प्रकृति ठीक आहे ना ? "

अगदीं साधा प्रश्न होता हा; पण त्यांत सगळें हृदय होतें तिचें. वेगळे-पणाविरहित भावना होत्या त्यांत. आपलेपणाची कळकळ ओतली होती.

त्यांत. हृदयाच्या सुंदरतेचा सुगंध दरवळत होता त्यांतून. अकलंकाचें सौंदर्य ओथंबत होतें तेथून. त्याच्यांत फक्त पापांचा अभाव होता.

"अगदींच अपुऱ्या पाहुणचारानं मन कसं अगदीं नाराज होऊन गेलं आहे." रुचीर हास्याचे पडसाद उमटवीत म्हणाला.

"तर तर!" कुमारी मध्येंच खोडसाळ हास्य करीत म्हणाली, "मेजवान्याच मोजून ठेवल्या होत्या कीं नाहीं तिथं तुमच्यासाठीं!"

या रम्य विनोदानें सबंध जनसंमर्द हंसू लागला. रुचीरनें उंचवलेल्या हृदयानें सर्वांना हात जोडून त्यांचे आभार मानले. तो नम्रपणें म्हणाला, "मी तुमचा आजन्म सेवक आहें. स्वप्नांतसुद्धां मीं या व्रतापासून अलिप्त असूं नये, अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. कसल्याही प्रकारानं गडबड होणार नाहीं अशा बेतानं, सर्वांनीं सभेसाठीं चलावं."

सगळे लोक शांतपणें सभास्थानाकडे निघून गेले. वसंतही रुचीरच्या परवानगीनें मुद्दामच गेला त्यांच्या समवेत.

"मला एक विनंति करायची आहे तुम्हांला!" सगळे लोक निघून गेल्यावर कुमारी त्याला म्हणाली.

"कुठल्या ठेवणींतून शब्द काढून आणलेत हे आज?" रुचीर मोठ्यानें हंसत म्हणाला, "विनंत्या ऐकण्याइतका मोठा माणूस नाहीं झालों मी अजून! मला आज्ञा चांगल्या पाळतां येतात. कान नेहमीं इतकेच आखूड असल्या-मुळें, एवढे मोठमोठे शब्द त्यांत शिरतच नाहींत."

अफाट हास्य कोसळलें त्यांच्यांतून या विनोदानें. तें कसें तरी सांवरून कुमारी म्हणाली, "असं आहे होय? बरं तर मग. आतां उपहारासाठीं बंगल्यावर येण्याची आज्ञा आहे आमची. चला पाहूं लवकर."

तिच्या त्या आज्ञा करण्याच्या अभिनयानें फिरून हास्य उफाळलें. तें आंवरून स्वरूप उद्‌गारली "इश्श!"

"चला कीं मग." रुचीर म्हणाला, "असली गोड आज्ञा कोण अमान्य करील?"

"आपण आधीं आमच्या घरीं जायला पाहिजे होतं!" स्वरूप म्हणाली.

"मला माहीत आहे तें." कुमारी म्हणाली, "पण शोफरबरोबर

बंगल्यावरचा निरोप आहे यांना घेऊन येण्याबद्दल. मग कसं करायचं? तिथून ताबडतोब घेऊन येतें मी यांना मग नाहीं ना कांहीं हरकत ? "

"हरकत कशाची आली आहे ? " स्वरूप म्हणाली, "पण तुला माहीतच आहे सारं. जरा लवकर घेऊन ये म्हणजे झालं."

"मला तरी कुठं चैन पडतं आहे त्या बंगल्यावर बसून ? " कुमारीनें सांगितलें, "तुम्हीही बसा ना दोघी. तुम्हांला सोडून जातां येईल आम्हांला ?"

जलद गतीनें मोटर निघून गेली.

---

## प्रकरण २३ वें

# बाबासाहेबांचें स्वगृहीं पत्र

परिस्थितीला निराळीच मुरड मिळाली होती आतां. अवघ्या वातावरणांत आनंद अन् आनंदच भरून राहिला होता. दगडावर पडलेलें फूल कधीं दुखावत नाहीं. यावरून दगडांत देखील मृदुपणा असतो, ही गोष्ट निर्विवाद आहे. त्याचप्रमाणें परिस्थितीचें आहे. ती जितकी कठोर आणि भेसूर असूं शकते, तितकी नाजुक आणि सुंदरही असूं शकते. कारण ती कालौघाबरोबर वाहात जाणारी एक प्रत्यक्ष अवस्था असते !

कालाचा ओघही निरनिराळ्या रंगानें बदलत असतो. तो स्वतःच बदलतो असें नाहीं, तर आपल्याबरोबर आपल्या इतक्याच रंगानें सबंध जग बदलून घेत असतो. अर्थात् त्याच्या प्रवाहांत जुनीं माणसेंही बदलून निघतात. जुनीं माणसें म्हणजे ठराविक चाकोरींतून चालणारीं अशिक्षित हृदयांचीं स्मारकें म्हणून नवमतवादी पिढी त्यांच्याकडे पाहात असते; पण त्यांच्यांतही कालप्रवाहाप्रमाणें कसा बदल होत असतो, हें पाहणें फार मनोरंजक आहे. याचें प्रत्यक्ष प्रतीक म्हणजे बाबासाहेबच होत. त्यांनीं आज आपल्या घरीं पुढील पत्र लिहिलें होतें.

आशीर्वाद विशेष,

बरेच दिवसांत पत्र नाहीं म्हणून तुम्ही सगळीं काळजींत असाल आणि खरोखरच परिस्थितीही काळजी करण्यासारखी होती. ती पत्रांत लिहितां येत नाहीं. अतिशय चांगल्या कामासाठीं जिवाचं मोल देण्यांत एक प्रकारचं समाधान असतं एवढं खरं.

रुचीर सत्याग्रहांत पकडला गेल्याची बातमी वाचलीच असेल तुम्हीं. कदाचित् तो सुटल्याची बातमीही या पत्राआधींच वाचायला मिळेल तुम्हांला. तो सुटला यांत कांहीं विशेष नाहीं—कारण चांगल्या गोष्टींचा आरंभ जरी कडू असला तरी शेवट गोड असतो हें अबाधित तत्त्व आहे. त्याला अनुसरून सगळेंच गोड होईल अशी आशा खेळवायला कांहीं हरकत नाहीं.

तो आज सुटणार आहे नव्हे सुटलाही असेल; पण माझी त्याची भेट नाहीं. मी येथें आल्याचें तरी त्याला माहीत असेल कीं नाहीं याची शंकाच आहे. माझ्या प्रकृतीच्या काळजीनं इथल्या मंडळींनीं वसंताला तार पाठवल्याचें आतां समजतें; पण तो आला नाहीं. असें कां झालें कळत नाहीं. कां तारच त्याला मिळाली नाहीं कोण जाणे ?

विशेष लिहिण्याचें कारण कीं, ज्या पत्रावरून मी इथें आलों, त्या पत्रांतील सगळा मजकूर खरा आहे; परंतु पत्र लिहिणारानं ज्याप्रमाणें पत्रांत स्वतःचं नांव लपवलं होतं, त्याप्रमाणंच त्यानं आपलं राक्षसी कारस्थानही लपवलं होतं! या दोनही गोष्टी इथें आल्यानंतर मीं ओळखल्या आहेत.

स्वतःचे दुर्गुण लपवण्यासाठीं आणि त्या दुर्गुणांची मिजास माजवण्यासाठीं, दुसऱ्यांच्या सद्गुणांवर निंदेचा शेणसडा टाकायचा, ही हीन प्रवृत्ति दुर्दैवानं चोहोंकडेच फैलावलेली आहे. त्यांतल्या त्यांत भरपूर पैशांच्या पोषाखाआड या प्रवृत्तीची फारच मोठी घाण सांचलेली असते. श्रीमंतांच्या घरांतली अडगळदेखील या अनवश्यक अभिमानाला बळी पडून वांकड्या वाटेनं धांवत असते! अपवाद सोडून

दिले तर, श्रीमंत म्हणजे विधात्याच्या हेतूंचें विद्रूप स्वरूप असेंच म्हणावें लागेल !

ज्या मुलीबद्दल पत्रांत मजकूर होता, त्या मुलीचें नांव स्वरूप पेडणेकर असें आहे. कुलशीलाची माहिती जी पत्रांत होती, तीच बरोबर आहे. म्हणजे माझ्या इथें येईपर्यंतच्या समजुतीप्रमाणं ती नाकं मोडण्या-सारखी घाणेरीच आहे ! परंतु माझी ती समजूत आतां राहिलेली नाहीं. याच मुलीच्या शीलावर दरोडा पडत असतां मला मधीं पडून जखम करून घ्यावी लागली. मी हल्लीं तिच्याच इथें औषधोपचार घेत पडून आहें. कारण ती डॉक्टर आहे.

शिक्षणाच्या दृष्टीनं रुचीर आणि स्वरूप, ही दोघेंही दोन टोंकाला उभीं आहेत; परंतु त्यांचे सद्‌गुण मधलें अंतर तोडून टाकीत आहेत ! तूं, मी, रुचीर, स्वरूप आणि आमचे स्नेही मणिभूषण ! हृदयांचे वेगवेगळे नमुने आहेत हे ! परंतु यांतलं अशिक्षित हृदय कोणतं ! मीच विचार करतों आहें अजून या गोष्टीचा !

काळ बदलतो आहे, जग बदलतं आहे. त्याबरोबरच माणसानं आपले सुविचार जागे करायला पाहिजेत. रूढीच्या डबक्यांत त्यांना दडपून ठेवून कुजवणं बरं नाहीं ! आपण सुविचारांची सोबत घेऊन या कुलशीलांचा प्रश्न सोडवूं लागलों, तर केवढा फरक पडेल कालच्या आजच्या वागण्यांत !

मला वाटतं आपण मुलीच्या शीलाकडं पाहावं. कुळाकडे पाहण्याचं कारण नाहीं. नाणावलेल्या कुलांत हल्लीं शीलाचे कमे उघड उघड धिंडवडे चालले आहेत तें आपल्याला माहीत आहे. दोन पिढ्यांपूर्वी-च्या शीलवंत कुलांत आज व्यभिचाराचा फुलवरा उफलला आहे. सात मजली भव्य हवेली नामशेष होऊन, त्या ठिकाणीं आतां कचऱ्याची पेटी मांडलेली पाहायला सांपडते ! अशा परिस्थितींत कुळाचा प्रश्न गौणच समजायला पाहिजे. राहतां राहिली शीलाची बाब. त्या बाबतींत माझ्या मनाला पटलेलं उत्तर असं आहे कीं, काळ्या कंच कोळशाच्या ढिगांत हिरा सांपडल्यावर कुणी फेंकून देईल काय ?

माझा सगळा अभिमान गळून गेला आहे. मी या लग्नाला संतोषानं संमति देणार आहें. या बाबतींत समाजाचा फारच मोठा रोष माझ्यावर होणार असून पुष्कळसे आघातही मला सहन करावे लागतील ! परंतु ते जरूरीचे शुभ प्रसंग समजून साजरे करणार आहें मी ! आघाडीच्या पथिकाला कांटे मोडायचेच ! पुष्कळशा प्रवाशांना मळलेली सडक वाट तयार करून देण्यासाठीं, सुरुवातीच्या कांहींना कांट्यांवरूनच चालायला पाहिजे ! पत्र पाहतांच चिरंजीव विमलसह निघून यावें. मला एकट्याला हा आनंद आतां संपत नाहीं. आपण सगळीं मिळून लुटूं या त्याला ! सोबत दिवाणजींनाही घेऊन यावें. मागची सगळी तजवीज त्यांच्या विचारानें लावावी.

माझ्या प्रकृतीबद्दल काळजी करूं नये. अनपेक्षितपणें झालेल्या आघातानं सातआठ तास शुद्ध हरवली होती एवढेंच फार मोठें दुखणें होतें. अंगावर पाहतां बाकीच्या गोष्टी मामुली स्वरूपाच्या आहेत. एवढें मोठें पत्र लिहिलें आहे; यावरूनच माझ्या प्रकृतीचें अनुमान करतां येईल !

करितां न घाबरतां सर्व तजवीज जिथल्या तिथें लावून निघून यावें. कळावें.

—बाबासाहेब.

इतकें विस्तृत पत्र लिहायला त्यांना पुष्कळच वेळ लागला. त्यांच्या अशक्त प्रकृतीवर एवढ्या श्रमानेंदेखील परिणाम केला. त्यांना दम लागल्या-मुळें ते तसेच मागे टेकून पडून राहिले कांहीं वेळ. थोड्याशा विश्रांतीनंतर त्यानीं गब्याला हांक मारली आणि तो येतांच त्याच्याजवळून एक कोरें पोष्टपाकीट मागून घेऊन, त्यावर घरचा पत्ता लिहिला व त्याला तें पोष्टांत नेऊन टाकायला सांगितलें. एवढे सगळें यथासांग झाल्या.वर ते समाधानानें स्वस्थ पडून राहिले.

थोडा वेळ ते असेच पडून असतां स्वरूप आंत आली आणि तिनें त्यांना औषध दिलें. तें ओठाजवळ नेतां नेतांच त्यांनीं विचारलें, " सुटले का सगळे लोक ? "

"हो; सुटले ना!"

"मग रुबीर नाहीं आला तो तुमच्याबरोबर?" किती तरी आतुरतेनें त्यांनीं हा प्रश्न विचारला होता. "माझ्याबद्दल नाहीं वाटतं सांगितलंत त्याला?"

"नाहीं अजून सांगितलं कांहीं." तिनें सस्मित वदनानें उत्तर दिलें. "राजसाहेबांच्याकडचा जरूरीचा निरोप मिळाल्यामळं ते तिकडे गले आहेत. आणखीन् तास अर्धा तासांतच येतील ते. तसं म्हटलं, तर मीं सांगायला पाहिजे होतं त्यांना आपल्याबद्दल. पण खरं सांगायचं म्हणजे कीं नाहीं, तें जमलंच नाहीं मला!"

"कांहीं बिघडलं नाहीं त्यांत." ते म्हणाले, "कांहीं वेळा अशा असतातच कीं, त्या वेळीं पुष्कळशा गोष्टी बोलणं बरं नसतं; शिवाय तो येईलच म्हणतां आतां. मग काय घटकेचा प्रहर होतो आहे थोडाच!"

आणखी कांहीं तरी बोलायचें असतांही ते गप्प बसून राहिले कांहीं वेळ. मग तें त्यांना सुचत नव्हतें म्हणून कीं अन्य कोणत्या कारणानें, हें समजणें फार कठिण होतें. त्यांना कांहीं तरी बोलायचें आहे हें स्वरूपनेंही ओळखलें होतें. ती त्याच अपेक्षेनें त्यांच्याकडे पाहात राहिली.

"अनंत आकाशांत इतस्ततः पसरलेल्या चांदण्यांप्रमाणें, माझ्या आशा अवास्तव फेंकल्या गेल्या आहेत. पाहिजे तर अप्रबुद्धपणें त्या पांगवल्या गेल्या असें म्हणा. त्या एका ठिकाणीं गोळा करण्याचा प्रयत्न करीत होतों मनांतल्या मनांत! मुठी भरभरून रत्नं फेंकतां येतील आणि गोळाही करतां येतील! पण पांगवलेल्या आशा गोळा करतां येणं, फार कठिण आहे; अशक्य आहे. मनुष्याच्या आशा म्हणजे त्याच्या मनांतल्या चांदण्याच होत. त्या गोळा करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां, त्यांच्याकडे पाहण्याचंच समाधान उपभोगीत बसावं. हाच निर्णय घेतला आहे माझ्या मनानं."

"अनंत आशांच्या बाबतींत हा निर्णय बरोबर असेल कदाचित्!" स्वरूप म्हणाली, "पण ज्या आशा प्रत्यक्ष फलद्रूप होतात, अगर होण्यासारख्या आहेत, त्यांच्याबद्दलचा काय निर्णय आहे आपला?"

"आशांपेक्षां निराशाच लवकर लवकर फलद्रूप होत असतात! परंतु चुकतमाकत कांहीं आशा जर फलद्रूप झाल्या, तर त्यांना कोण कंटाळतं आहे? लांब कशाला, आतांच एक आशा माझ्या मनानं पेरली होती. आणि तिच्याच फलद्रूपतेचे विचार उगाळीत होतों! आणि त्याच बाबतींत मनानं घेतलेला अखेरचा निर्णय तुम्हांला सांगितला आतां मीं."

"कशावरून म्हणतां ती फलद्रूप होणार नाहीं म्हणून?" तिनें विचारलें.

"जें डोळ्यानं दिसतं, त्याला दुर्बिण कशाला पाहिजे?" ते हंसत हंसत म्हणाले. "आज मला असं वाटत होतं कीं, आतां रुचीर येईल नि मला भेटेल. असाच या वेळीं वसंत भेटेल का येऊन मला? अर्थात् नाहीं हेंच या आशेला उत्तर आहे. नाहीं का!"

"नाहीं!" मनोहर हास्य करीत ती उत्तरली.

"म्हणजे? मी नाहीं समजलों!" ते म्हणाले.

"पुष्कळशा आशा, परिस्थितीच्या प्रेरणांनीं उमटत असतात! त्यांतलीच तुमची ही आशा होती. वसंतरावही इथें आलेले असून, बरोबरच येणार आहेत त्यांच्या."

"काय म्हणतां?" आश्चर्यातिरेकानें म्हातारा म्हणाला, "मग मात्र तुमचंच म्हणणं बरोबर आहे."

"अग बाई! बराच वेळ झाला. अजून तुम्हांला चहा नसेल. मीच येतें हं घेऊन इतक्यांत. मेली माझी आठवणच हरवली होती अगदीं."

असें म्हणत लगबगीनें ती खालीं निघून गेली. समाधानाच्या जादूनें भारलेले आबासाहेब दरवाज्याकडे नजर लावून पडून राहिले.

---

## प्रकरण २४ वें

# शुभ ग्रह गोळा झाले !

तसें म्हटलें तर सगळे शुभ ग्रहच रुचीरच्या कुंडलींत उभे होते. कांहीं तोडके मोडके अपवाद वगळले तर, त्याला अपयश देणारे प्रसंगच फारसे उगवले नाहींत. जे प्रसंग उद्‌भवले, त्यांनीं त्याच्या आयुष्यांत सुखमय क्रांतीच केलेली आहे. शिकारीला गेला असतां जखम झाली, तिनें त्याच्या आयुष्यांत स्वरूपचा सहवास उत्पन्न केला; व्याख्यानाला गेला, त्याच्या आयुष्याची सार्वजनिक आयुष्यांत थारेपालट झाली; तुरुंगांत रवानगी झाली, त्याच्या आयुष्याचा इतिहास बदलला! एवंच प्रत्येक नव्या प्रसंगानें त्याच्या आयुष्याची उन्नत क्रांति होत गेली. प्रत्येक प्रसंग, हा प्रत्येक माणसाच्या आयुष्यांतील क्रांतीचा द्योतक असतो, असाच निष्कर्ष आहे या सगळ्याचा !

राजेसाहेबांच्या बंगल्यावर जरा वेळापूर्वी ज्या वाटाघाटी झाल्या, त्याही त्याच्या यशाच्याच वाटेकरी होत्या. तेथून तो अत्यंत उल्हासानेंच स्वरूपच्या बंगल्यावर आला होता. पुष्कळ वेळां सुखें हीं वळवाच्या पावसा-प्रमाणें सडसडून वर्षाव करीत असतात. आज त्यांनीं रुचीरसाठीं खर्च व्हायचें ठरवलें होतें. कारण स्वरूपच्या स्वरूपांत प्रत्यक्ष प्रसन्नताच त्याच्या स्वागतासाठीं दारांत उभी होती. त्याच्या पुष्कळशा आशाच फलद्रूप होऊन तिच्या स्वरूपांत उभ्या होत्या! [त्याचें रम्य असें अर्धें आयुष्य उभें होतें तें.

त्याच्या पाठोपाठच वसंत आणि कुमारी हीं आंत शिरलीं. दिवाण-खान्यांतील एका खुर्चीवर बसतां बसतां रुचीर म्हणाला, "अति गोडानं अज़ीर्ण होतं म्हणतात, तसंच अति स्वागतानंही होत असलं पाहिजे. निदान मला तरी तसं होऊं पाहात आहे खरं. या जरूरीपेक्षां अधिक प्रकारानं, मनुष्याची कर्तव्यबुद्धि मारली जाऊन, नसता अहंभाव मात्र त्याच्या अंगांत शिरतो. मनुष्याच्या कर्तव्यबुद्धीला फाजील मोबदला दिला जातो हा. जें करायलाच पाहिजे तें केल्याबद्दल गौरव कशाचा करायचा ? अशानं

मनुष्य कर्तव्य म्हणून कांहीं एक न करतां, या लांचेच्या आशेनं करूं लागतं आणि याचा परिणाम एकमेकांच्या स्पर्धेत होतो अखेर ! "

"पुरे बाई हें आतां." कुमारी गमतीच्या कंटाळ्यानं म्हणाली, "कुणीदेखील स्वागताच्या ताटल्या भरून उभं राहिलेलं नाहीं इथं. उगीच उगाळण पाहिजे कशाला हें नसतं !"

"तें नको असेल; पण हें तरी पाहिजे आहे का ?" चहा घेऊन यणारी प्रगति म्हणाली, "पहा बाई ! नाहीं तर अति अधिकानं प्रकृतीचं तेलवण निघायचं उगीच !"

तुफान हास्यांत त्यांनीं त्या पेयाचा समाचार उडवला ! आतां कुमारी थोडा गंभीरपणा आणून सावकाशपणानें बोलूं लागली, "हें पाहा रुचीर, मला आतां एक विशेष गोष्ट सांगायची आहे तुम्हां दोघां बंधूंना. ती सांगायला कुठून सुरुवात करावी, याचा विचार करीत होतें मी; पण सुरुवातीसाठीं कुठलेच योग्य शब्द गोळा करतां येईनात मला. आज, आतां, या वेळीं, या ठिकाणीं आपले वडिल हजर आहेत."

दोघेही भाऊ आश्चर्यानें पाहातच राहिले तिच्याकडे. हा अशक्य गोष्टींचा गुच्छ, विधात्यानें कसा बांधला, हेंच समजेना त्यांना. मानवांना अशक्य वाटणाऱ्या अशा किती तरी गोष्टी परमेश्वर रोज बांधीत असतो, याचा विचारच केला नाहीं त्यांनीं. ही असली विचित्र गुंफण, विधाता हेतुपुरस्सर करीत असतो. अनेकविध वैचित्र्यांतून कांहीं तरी विशेष उकलून दाखवायचें, हा तर त्याचा रोजच्या करमणुकीचा खेळ ! त्याला शक्य नाहीं असें काय आहे ?

"हें कसं शक्य आहे !" रुचीर म्हणाला.

"मला तर अकल्पित स्वप्न वाटतं आहे हें !" वसंत म्हणाला.

"स्वप्न असेल; पण तें सत्य आहे." प्रगतीनें उत्तर दिलें.

कुमारीनें त्यांना साद्यंत हकीकत निवेदन केली. ती ऐकून तर ते हतबुद्धच होऊन गेले. अगोदर बाबासाहेब कांहीं एक न कळवतां असे एकाएकीं आले कसे, त्यानंतर त्यांना या कटाचा सुगावा लागला कुठें, त्यांनीं या अलौकिक धाडसांत उडी काय म्हणून घातली आणि शुद्धीवर आल्यावर

त्यांनीं या घरांत अन्न घेतलं कसं ? एकाही गोष्टीची संगति जुळवतां येईना. ते तशाच आश्चर्यवत् परिस्थितींत उठून बाबासाहेबांच्याकडे गेले.

अत्यंत आतुरतेनें दाराकडे दृष्टि लावून पडलेल्या वृद्धाच्या नेत्रांत, त्यांना पाहून केवढा तरी आनंद उसळला एकदम. आनंदाश्रूंनीं दोन्ही सरोवरें तुडुंब भरून वाहूं लागलीं ! सगळ्यांना प्रेमळ आशीर्वाद देऊन त्यांनीं बसायला सांगितलें. त्यांच्या समोर खुर्च्या ओढून घेऊन तीं सगळीं बसल्यानंतर बाबासाहेब म्हणाले, "आश्चर्य वाटलें असेल तुम्हांला मला इथें पाहून ! पण फार भाग्याची कथा आहे ती माझ्या."

"आपण येणार असल्याबद्दल कांहीं देखील तुमच्या पत्रांतून नव्हतं. नाहीं तर मी माझं काम आटपून ताबडतोब आलों असतों परत." रुचीर म्हणाला.

"ज्याला देशाचा संसार नीट मांडायचा असतो, त्यानं घरच्या आठवणी आणि काळजी पुसून काढायला पाहिजेत !" बाबासाहेब सहास्य मुद्रेनें म्हणाले.

"मला नाहीं वाटत असं." कुमारी मधेंच म्हणाली, "ज्याला देशाचा व्यापक संसार करायचा असतो, त्यानं घरचा संसार आधीं नीट मांडायला पाहिजे. ज्याला स्वतःचं तोंड धुतां येणार नाहीं, त्यानं कसली जगाला स्वच्छता शिकवायची !"

किती उत्कृष्ट उत्तर होतें हें. तें बाबासाहेबांना पटलेंही होतें. ते थोडंसें हंसून म्हणाले, "मनपसंत उत्तर आहे हें ! निर्मळ हृदयांतूनच असलीं वचनं उगवत असतात. छान !" असें म्हणून ते थोडा वेळ थांबले आणि पुढें बोलूं लागले, "तुला न कळवतां तर यायचं होतं मला; मग तुला कसं कळवणार मी ?"

असें म्हणून त्यांनीं आपल्याला आलेल्या बिननांवी पत्रापासूनची सगळी हकीकत सांगितली. नंतर ते म्हणाले, "थोडा वेळ कुणी बोलूं नका मध्यें. मला पुरतेपणीं बोलूं द्या एकदां. सांचलेला गाळ उपसून टाकल्यावांचून पाणी स्वच्छ होणार नाहीं. धुऊन पुसून स्वच्छ करणार आहें मी माझें हृदय आज. धांवत्या वाऱ्यानं उधळलेल्या धुळीमुळं, किती तरी स्वच्छ भिंगं मलीन होत असतात. माणसाच्या मनाचंही तसंच आहे. कुठून तरी

धांवत येणाऱ्या शंकांनीं तीं मलीन होत असतात. रूढीच्या कांट्यांत पडलेलं मन, बेसुमार दुबळं झालेलं असतं. त्याच्यावर येऊन आदळणाऱ्या नाना प्रकारच्या शंकांचा कचरा, त्याला सहजासहजीं उडवतां येत नाहीं. तें त्याच्यांतच गंजून पडत असतें. माझ्या मनाचीही तीच स्थिति झाली.

"मी अभिमानानं सांगतों, माझ्या मुलांच्या सच्छील हृदयांची जर मला जाणीव नसती, तर इतर आतताई जनकांप्रमाणं मी त्यांना वेडंवाकडं पत्र पाठवून, जाग्यावरूनच दुगाण्या झाडल्या असत्या ! मी माझ्या मनावर विकृत शंकांचा जाड थर होऊं दिला नाहीं.

"रूढीच्या खाईंत किती तरी टाकाऊ गोष्टींची भुतावळ नाचत आहे, हें मला आतां पटलं आहे. रूढीनं कांहीं एक सुधारणा न ठेवतां, कायमची घाण मात्र सांचवून ठेवली आहे. कांहीं चालून गेल्यावर मागें पाहणाराला, आपण कोणत्या प्रकारची वाट चालून आलों, त्याची जाणीव होते ! रूढीचे गोडवे गाणारांनीं तेंच करावें. भिन्न परिस्थितींत स्वतःला घेऊन जाऊन तेथून मागें पाहावें ! आपण शृंगारून ठेवलेल्या घाणीखेरीज कांहींसुद्धां पाहण्यासारखं असणार नाहीं ! त्यापेक्षां या लांबच लांब वहावत जाणाऱ्या नव्या वाटेवर, किती तरी नव्या आणि सुंदर अशा घेण्यासारख्या गोष्टी आहेत !

"मी इथें आल्यावर हा उजेड मला दिसला. स्पष्टच सांगतों मी आतां. स्वरूपसारख्या मुलीच्या इथलं पाणीसुद्धां अमंगल मानणारा मी. पण आतां ... पण पुढें सांगण्याचं कारणच कुठं उरलं आहे. पाणी आणि अन्न, दोन्हीही घेतों आहें मी इथं. आणि तें घेतांना, अद्यापपर्यंतच्या वयांत हरवलेलं समाधान मिळाल्याचा आनंद होतो आहे मला.

"माझ्या भोंवतीं पिसाळलेलीं रूढीबंधनं, भसूर भणभण करून मला भेडसावीत असतांही मीं त्यांना लाथाडलं आहे. प्रत्यक्ष परिस्थितीचा अभ्यास करून, रूढीनं रुळलेले विचार सोडून देणं जरूर आहे असं दिसून आलं मला; आणि म्हणून मीं माझ्या मनाला नव्या वाटेनं जाण्याचा सल्ला दिला आहे.

"मघाशींच मीं घरीं पत्र लिहिलं आहे सगळ्यांना निघून यायला. पुढच्या आनंदासाठीं सगळेच तयार होऊं या आतां ! "

नितांत शांतता पसरली होती तेवढ्या जागेत. प्रत्येक जण स्वतंत्र भावनेनें स्तब्ध झाला होता. स्वरूप समाधानानें ओशाळली होती, रुचीर आनंदानें गुदमरला होता, वसंत सगळ्याच नव्या विचारांनीं गुंगला होता, प्रगति कुठल्या तरी विचाराचे धागे ओढीत होती आणि शैला, श्रीकृष्णाचा आदेश मनाशीं वाचीत होती : सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ। आणि याच अमृतानें ती स्वतःला सांवरीत होती. ती त्यांना म्हणाली, "त्या पत्राचा लेखक नाहीं सांगितलात आपण ! अंधारांत धोक्याचे खडक कुठें कुठें आहेत, तें समजलेलं बरं ! नाहीं का ?"

"ओळखला आहे मीं त्याला." बाबासाहेब कांहींसें हंसून म्हणाले, "पण तेवढीच गोष्ट मीं माझ्या मनांत ठेवायचं ठरवलं आहे. ज्या गोष्टी सांगितल्या असतां जगांत वैरानल उत्पन्न होईल, त्या गोष्टी कधींही बोलूं नयेत. काळोखांतले खडक दुसऱ्याच्या डोळ्यानं पाहण्यापेक्षां, स्वतःच्याच नजरेनं पाहणं चांगलं. उघड्या डोळ्यानं जो फिरायला निघतो, त्याला केवढ्याही गडद अंधःकारांत दडलेले, धोक्यांचे खडक दिसतील. कायम दृष्टि असणाऱ्या अंधळ्याला, धोक्याविरहित जागाच असणार नाहीं कुठें !"

"खरं आहे आपलं म्हणणं." स्वरूप नम्रपणें म्हणाली.

"खऱ्याखोट्याचा वाद नाहीं आहे इथं !" शैला जरा तीव्रतेनें म्हणाली, "हा तत्त्वाचा प्रश्न आहे. दृष्टीआड दडलेले हे प्रतिष्ठित उकिरडे, उघड्यावर उपसायला पाहिजेत, असं माझं म्हणणं आहे ! प्रत्येकानं आपली दृष्टि वापरावी, हें मलाही कबूल आहे ! पण याचा अर्थ असा नव्हे कीं, दृष्टि असलेल्या अंधळ्यांना खुशाल धडपडूं द्यावें ! अशीं अनेक बावळीं माणसं आहेत या जगांत कीं, ज्यांना डोळे असून दिसत नाहीं, कान असून ऐकूं येत नाहीं आणि तोंड असून बोलतां येत नाहीं; त्यांना काय तुम्ही त्यांच्या अजागळपणानं मरायला सांगणार ? मग सहानुभूति कशाला केली आहे ? ज्ञातेपणाचा काय उपयोग ? धर्मतत्त्वांचा डोलारा कशाला उभा पाहिजे ! या काय मुळींच न विकण्यासाठीं बाजारांत मांडलेल्या वस्तू आहेत ? असें असेल, तर मी ढोंग म्हणेन त्यांना !"

"याहीपेक्षां कढत पाणी माझ्यावर ओतलंत, म्हणून मी चळणार आहे

त्याची शाश्वति नाहीं. कदाचित् प्रचारकार्याच्या दौऱ्यावर असतांनाही अटक होईल मला. तसं झालं तर आपल्या फिरून गांठीभेटी लवकर होणार नाहींत. तुरुंगाच्या दारांत उभें राहून बाहेरच्या आशांचा निरोप घेणं, हें कमकुवत मनाचं लक्षण समजलं जात असेल कदाचित्; पण त्याला नाइलाज आहे. सुटल्याबरोबर कुठल्या आशेकडे धांवत जाऊन आपल्याला समाधान घेतां येईल, कुठल्या हृदयाचे धागेदोरे आपल्याबद्दलच्या काळजीनं पिंजून निघत असतील, कुठले डोळे आपल्या भेटीसाठीं आतुर असतील आणि कुणासाठीं हें धडधाकट आयुष्य घेऊन बाहेर यायचं ! सक्तमजुरीच्या यातनांपेक्षां याच विचारांच्या यातना फार जाणवतात आंत ! देशासाठीं देहाचं दान करतांनाही असल्याच विचारांची खिन्नता माणसाला रंजीस करीत असते ! आयुष्याला कांहीं तरी माधुरी पाहिजे......म्हणजे त्या समाधानाच्या तंतूंवर नाचणाऱ्या जिवाला ......कसल्याही संकटांत यातना होत नाहींत. मी त्या माधुरीचा याचक म्हणून आज इथें आलों आहें."

तरीही स्वरूपची मूकवृत्ति कायमच होती. त्याचें अधीर मन तिच्या शब्दासाठीं तृषार्त झालें होतें. अबोल परिस्थितीला कंटाळून तो उतावळेपणानें परत बोलूं लागला, "माझ्या सगळ्या आशा तुझ्या ठिकाणीं एकत्र झाल्या आहेत. कसल्याही संकटानं माझ्या मनावर परिणाम होत नाहीं, पण तो आतां तुझ्या उत्तरानं होणार आहे. माझ्या या अनपेक्षित प्रश्नानं जर तुझ्या भावना दुखावल्या जात नसतील, तरच मला उत्तर पाहिजे आहे. सांग, आयुष्याचा सहकारी, सेवक, भक्त किंवा जोडीदार म्हणून माझा स्वीकार करशील का ? आपल्या शिक्षणाकडे पाहिलं, तर माझ्या अशिक्षित हृदयाची पायरी फार खालची आहे; परंतु अशिक्षित हृदयाचा सेवक भक्तीच्या जोरावर पायापर्यंत येऊं शकतो !"

आतां मात्र तिला हृदय बांधून मारतां येईना. तिच्या भावना उचंबळून आल्या. ती त्याला थांबवून कांतर आवाजांत म्हणाली, "हं ! असलं भलतंच कांहीं तरी नका बोलूं ! मी बोलूं देणार नाहीं असं वेडंवाकडं ! सांगा, मीं कोणतं उत्तर दिल्यानं समाधान होईल आपलं !"

"ज्या उत्तरानं तुझं स्वतःचं समाधान होईल, त्याच उत्तरानं माझं

## प्रकरण २५ वें

# स्वरूप आणि शैला

पहांटे पांच वाजले होते जवळ जवळ. अंधुक अंधुक अंधार अजूनही हरवला नव्हता. कांहीं कावळयांच्या कर्कश करकरीखेरीज कसलेंच कूजन सुरू झालें नव्हतें अजून. नाहीं म्हणायला कांहीं प्रभातस्नानाला जाणारे लोक आणि सकाळच्या मोकळया हवेवर पाय मोकळे करून येणारे लोक, यांची ये जा मात्र सुरू झाली होती.

अशा या अत्यंत प्रसन्नसमयीं स्वरूप आपलें नैमित्तिक आटपून झोंपलेल्या प्रगतीशजारीं बसून पुढील भूपाळी आळवीत होती.

"ऊठ ऊठ राधिके लवकरीं, हृदयाच्या सुंदरी ।। लवकरीं० ।।
कृष्ण झोंपला जाग न ये त्या जागें करि लवकरीं ।।
प्रेमभक्तिनें भगवंताला कर्तव्याचे धडे—शिकवि तूं ।।
देव जाणतो; जाणिव त्याला परि दे अणखी गडे ! ।।
झोंपलीस तूं तोहि झोंपला; जागा परि कालिया-विषारी ।।
बुडविल त्याला कोण पर्दी मग भेसुरशा कालिं या ।।
कालयवन मातला मोडिला स्वातंत्र्याचा ध्वज—आपुल्या ।।
शांत कराया अकांत हरिला राधे उठवीं आज ।।
नयनीती या उजाड जाल्या, वैभव वरि खिन्नता—भगवती ।।
आनंदाच्या चिता चेतल्या बघ हंसती आपदा ! ।।
धर्म वरी बनवास घेउनि भ्राते, नीती सती—द्रौपदी ।।
दुर्वासांची फिरे वासना मांडी छळ दुर्मती ।।
शय्या सोडुनि जागी झाली पूर्वा केव्हां तरी—तव सखी ।।
किंचित झाला वेळ म्हणुनिया लज्जेनें शोभली ! ।।
धीर निघेना, स्थीर झोंप ही लांछन तुजसीं खरी—राधिके ।।
कांचन उधळी अरुण तुजवरी उघडी डोळे तरी ।।

**रात्र संपली स्वातंत्र्याचा ध्वज अरुणाच्या करीं—आपुला ॥**
**ऊठ स्वागतां निरांजनीं घे उजळुनि कोमल करीं ! ॥ १ ॥ "**

भूपाळीचे स्वर छेडीत असतां स्वरूप स्वतःला पार विसरून गेली होती. प्रगतीला जाग येण्याऐवजीं ती या गोड गुंगीनें अधिकच घुरमळली ! पहांटे फिरायला म्हणून आलेली कुमारी, हे गोड आलाप ऐकत तशीच जिन्याच्या वरच्या पायरीवर उभी राहिली होती. ती आतां पुढें येऊन हंसत हंसत म्हणाली, "अशा गोड गाण्यानं ही जागी होणार आहे होय ? तिला ही अश्शी जागी केली पाहिजे."

असें म्हणून ती पुढें झाली आणि खसकन् प्रगतीच्या अंगावरचें ओढून एका बाजूला फेंकून देत म्हणाली, "अग ए आळशी ! ऊठ कीं आतां. सूर्याच्या कोवळ्या दोऱ्या तोंडाभोंवतीं फिरूं लागल्या, तरीसुद्धां झोंप नाहीं उडत या वेंधळीची ! स्वातंत्र्याचा प्रभातकाल झाला असतांही, भारता-वरचा आळस उडाला नाहीं अजून ! आतां उठतेस बऱ्या बोलानं का काढूं चिमटे अंगभर ? "

इतकें झाल्यावर कुठलें राष्ट्र झोंपून राहील ? कळकळीनें चिमटे काढणारे भेटल्यावर, काळझोंपासुद्धां उडून जातील; मग असल्या मु ाम झोंपा विरून गेल्याचें काय नवल ! प्रगति उठून दोन्ही हातांनीं केंस मागें सारीत हंसून म्हणाली, "भारीच बाई अचपळ तूं. भारताचं दैव, एका ठिकाणीं गोळा करून आणण्याच्या कामगिरीवर कां निघाली आहेस इतक्या सकाळीं ? "

"अग सगळ्यांसाठींच ती कामगिरी आहे." कुमारी म्हणाली, "तथापि तुझ्या आधींचा माझा नंबर आहे ड्यूटीवर. फार दमलें आहें मी."

"ही चहाची प्रस्तावना असेल." प्रगति बोलली.

"मग त्यांत काय चुकलं माझं. जें काम करील तें दाम मागील ! पण तूं काय उजेड पाडणार आहेस, तें दिसतंच आहे. स्वतःच्या तोंडाला पाणी लागलं असेल तर पहा आधीं; ही म्हणे आम्हांला चहा देणार ! "

"अश्शी आहेस कीं नाहीं अगदीं ! " प्रगति मान तिरपी करीत,

कुंदकळ्या अर्धवट उघडून म्हणाली; आणि उठून आंत निघून गेली. तिनें जातां जातां उठवलेल्या गोड हास्यध्वनींत, यांच्याही हास्याचा मिलाफ झाला. तो ओसरतांच स्वरूप गंभीरपणानें कुमारीला म्हणाली, "बरं झालं तूं आलीस. मला पुष्कळच बोलायचं आहे तुझ्याशीं. मी निरोपच पाठवणार होतें तुला."

"रोजच चार वाजतां बाहेर पडतें मी फिरायला! जातां जातां म्हटलं तुलाही घेऊन जावं आज. मोटर उभीच आहे खालीं."

"इथंच बसूं बोलत आपण. पाहिजे तर मोटर जाऊं दे परत." स्वरूपनें सांगितलें.

"कांहीं जरूर नाहीं तशी. असू दे आहे तिथंच. रुचीर, वसंतराव, बाबासाहेब, सगळी मंडळी कुठं मागच्या मजल्यांतच आहेत वाटतं?"

"ते कालच गेले स्वतःच्या बंगल्यांत त्यांना घेऊन. रुचीर येतील कदाचित् आणखीन् थोड्या वेळानं."

"असं होय? पण तेंच बरोबर आहे. स्वतःचा बंगला असतांना आणि त्याचं करणारे जवळ असल्यावर, हें असंच व्हायला पाहिजे. दूरदृष्टि वापरणाराचं हें असंच पद्धतशीर चालायचं."

"पण मला त्याबद्दल नाहीं बोलायचं तुझ्याशीं."

"मग कशाबद्दल बोलायचं आहे? बोल ना मग मन उगाळून. माझ्याशीं बोलण्यासाठीं म्हणून कांहीं निराळे का शब्द शोधून काढायचे आहेत?"

"शब्दही नवीन नाहींत अन् विषयही नवीन नाहीं. माझ्यासाठीं तूं आपला निश्चय ढिला करायला पाहिजे. अंहं. बोलूं नको मध्यें. तुझ्या त्यागावर माझं जीवन चालू करण्याचं धाडस, मला नाहीं होत. रुचिरांना तूंच योग्य आहेस. स्पष्टच बोलतें मी आतां; एका हीन कुलांतील मुलीशीं लग्न लावण्यानं, त्यांना आपल्या सार्वजनिक आयुष्यांतून उठावं लागेल. तसं होऊं नये म्हणून ही गोष्ट करायला पाहिज. शैला, आपला परमेश्वर निष्कलंक राहावा म्हणून, भक्तांनीं ही झीज घ्यायलाच पाहिजे. नाहीं का?"

"अं! अगदींच अपुरी सबब आहे ही." शला निश्चयानें उत्तर देऊं लागली, "या बाबतींत कांहींसुद्धां एकणार नाहीं मी तुझं. भक्तापेक्षां

परमेश्वराचा त्याग फार मोठा असायला पाहिजे. म्हणे हीन कुल ! ज्याला दुसऱ्याचं हीनत्व नाहींसं करतां येत नाहीं, तो स्वतःच हीन ठरत असतो. असेल तुझं हीन कुल; पण त्यामुळें तूं कशी हीन झालीस ? हलकट मनाचे विपर्यास आहेत हे ! अमुकच ठिकाणीं शील उत्पन्न व्हायला पाहिजे, असं बंधन निसर्गावर घालण्याची कुवत, एका तरी धर्ममार्तंडांत आहे काय ? ज्यांच्या अंगांत वकूब नाहीं, त्यांनींच हे धंदे धरले आहेत. अंगाभंवतीं धाबळी गुंडाळून हातांत पळी पंचपात्री घेऊन जाणाऱ्या दांभिकांनीं, वाटेल तीं बंधनं उपस्थित केल्यानं निसर्गनिर्मित शीलाला बट्टा लागतो वाटतं ? ज्याला स्वतःचं शील नाहीं, तो दुसऱ्याला कमशीलाचा म्हणून स्वतःच्या प्रभावळींत ओढीत असतो ! कांट्यामुळं केवड्याचा वास मरत नाहीं, कांट्यामुळं गुलाबाचं सौंदर्य झडत नाहीं, वास उडत नाहीं. त्याचप्रमाणं कुठल्याही कुलांत, कशाही प्रकारानं जन्म झाला म्हणून, त्या व्यक्तीचं निसर्ग-दत्त शील सडत नाहीं.

"माझ्यासारख्या मुलीशीं रुचिरांनीं लग्न लावलं, तर तें त्यांचा दुबळपणा दाखवील. त्यांच्यासारख्या तरुणांनीं, रूढीच्या आच्छादनाखालीं झांकून राहिलेल्या जरूरीच्या नव्या वाटा उघड्या करायला पाहिजेत. जुन्या घाणींत कुजून मरायला, पुष्कळ धर्ममार्तंड, धर्मवीर, धर्मसम्राट्, काय वाटेल तें म्हण ! सगळे जिवंत आहेत. प्रगतिपथानं निघालेल्या राष्ट्राच्या तरुण पिढीनं, ती वाट धरण्याचं कांहींच कारण नाहीं. तुझ्याशींच त्यांचं आयुष्य एकरूप व्हायला पाहिजे."

"शैला, तुझ्या आशा होरपळत ठेवून, मी त्या जागेवर जाऊं म्हणतेस ! माझं अंतःकरण काय दगडांनीं बांधलेलं आहे होय ?" स्वरूप सकंप स्वरांत म्हणाली.

"माझ्या मलूल आशा टवटवीत मात्र होतील यामुळं. स्त्रियांना स्वतःचीं मनं चांगलीं तयार करतां येतात; आणि म्हणूनच त्या ज्या घरीं जातात, त्या घरांतील सुखदुःखांशीं एकरूप होतात. मीं माझं मन चांगलं तयार केलं आहे. आतां माझा आनंद, तुम्हां दोघांच्या आनंदानंच वाढणार आहे."

" तें कांहीं असलं तरी मी त्यांना नकार द्यायचं ठरवलं आहे. तेव्हां...." स्वरूप आणखीही कांहीं तरी बोलणार होती असें दिसलें. परंतु कुमारीनें तें पुरें होऊं दिलें नाहीं. ती म्हणाली, " तुझ्या इच्छांना मी कशी अडवणार ? माझ्यासाठींच तूं हा स्वार्थत्याग करणार ना ? ठीक आहे. यतें तर मी आतां ! '

असें म्हणून ती चिडल्यासारखी उठली. तिला खालीं बसवन स्वरूप म्हणाली " असं काय करतेस वेड्यासारखं ? कुठं जाणार तूं असा त्रागा करून ? "

" मी माझं अस्तित्वच दडवणार आहें इथून. दृष्टीपाठीमागें हवा तो गोंधळ घाला तुम्ही. "

" तूं असा त्रागा केल्यावर मिटलंच म्हणायचं सगळं ! मग मी कुणासाठीं करायचं एवढं ? तुझ्यासाठींच ना ? "

" माझ्यासाठींच जर कांहीं करायचं असेल, तर मी म्हणतें त्याप्रमाणं झालं पाहिजे. तसं नसेल तर काय करायची आहे ही तोंडदेखली पुरवणी ? "

" बरं बाई ! " स्वरूप खिन्नपणें म्हणाली. हें म्हणत असतां तिची प्रसन्नता पार मळून गेली होती. ती पुढें म्हणाली, " तूं म्हणतेस तसं का होईना ! मग तर होईल समाधान ! "

" अग बाई ! केवढा उशीर झाला हा ! " कुमारी स्वतःचें समाधान लपविण्यासाठीं म्हणाली, " मी जातेंच बघ आतां. " आणि ती गेलीही होती जिन्याच्या तोंडापर्यंत. आंत आलेल्या प्रगतीनें हांक मारली तिला.

" कां ? निघूनशी चाललीस ? चहा कुणी घ्यायचा तुझ्या वांट्याचा ?"

" माझ्या वांट्याचा असेल तर तो मलाच घ्यायला पाहिजे. पण तो तुझ्या तावडींतून सुटून आमच्या वांट्याला येईल तेव्हां ना. कुठल्याशा आधाशानं दुनिया खाल्ली असं म्हणतात. "

" गरीब बिचारा तो आधाशी ! त्याला दुनिया पचवतां आली सगळी; पण तूं कांहीं पचली नाहींस त्याला. त्यामुळेंच तर तूं दुनियेवेगळी उरून दिसत आहेस ! "

हास्याचा पूर लोटला होता कांहीं वेळ तिथें. थोड्या वेळानें कुमारी निघून गेली.

---

## प्रकरण २६ वें

# गोड शेवट

रूढीचीं बंधनें, एकटया दुकटया माणसाला तोडून टाकतां येतील, असें नाहीं; परंतु तेवढयामुळें, त्यानें केलेला प्रयत्न कमी किमतीचा ठरणार नाहीं. वटवृक्षांच्या आणि आम्रवृक्षांच्या विस्तीर्ण शाखांनीं अंथरलेल्या सावलींत, हजारों जीव विसांवा घेत असतात; परंतु ते वृक्ष म्हणजे, कुठल्या तरी एका जिवाच्या प्रयत्नांचेंच फळ होय! या दृष्टीनें पाहणाराला, एकटयादुकटयाच्या कामगिरीचें मोल समजेल.

बाबासाहेब समाजांत एक जरूरीची अशी नवीन प्रथा निर्माण करीत होते. सुरुवातीला ती त्यांना जाचक होणारी असली तरी, परिणामीं ती एकंदर मानवी संस्कृतीलाच उपकारक ठरणारी होती.

अशा किती तरी गोष्टी आहेत कीं, त्या बदलण्याची आपल्याला जरूरी उत्पन्न झाली आहे. प्रत्येक जण कांहीं ना कांहीं बदलण्याची आवश्यकता प्रतिपादीत असतो; परंतु ती गोष्ट, होणारे आघात पत्करून पुरी करायला कोणीही फार श्रम करून पुढें येत नाहीं. एकाद्यानें तशी कांहीं हालचाल करतांच, त्याच्याभोंवतीं असें कांहीं घेंकांवरें उठवलें जातें कीं, तो सुरुवातीच्या कांहीं पावलांतच गळून पडावा! जे लोक अशा तऱ्हेनें एकाद्याच्या विरुद्ध उठावणी करीत असतात, त्यांना खरोखरच कांहीं समजतें असें नाहीं; आणि त्यांतील ज्या कांहींना थोडेंबहुत समजत असतें, ते आपल्या स्वार्थासाठीं या असमंजसांचे पुढारी बनलेले असतात! जगांत फुलांपेक्षां कांटयांची संख्या अधिक आहे. अर्थात् त्यांचा त्रासही तितकाच अधिक व्हायचा; कारण त्यांचें कायच दुसऱ्याला त्रास देण्याचें आहे. त्यांना दूर करून, पायाखालची वाट मोकळी करून घेण्याचें कार्य कुणीं तरी करायला पाहिजे. बाबासाहेब आणि रुचीर यांचा प्रयत्नही कांहींसा त्यांतलाच होता.

बाबासाहेबांची मंडळी त्यांच्या पत्राप्रमाणें निघून आली होती. विमलनें आपली वहिनी तावडतोब पसंत केली होती आणि तें बरोबरही होतें.

तिला रूढि, कुल, शील, वगैरे नाना प्रकारच्या चौकशाच करतां येत नव्हत्या. जें चांगलें दिसेल आणि असेल, तें आपल्याला असावें, एवढ्याच बुद्धीनें तिची ही पसंति होती.

आनंदीबाईंची गोष्ट मात्र निराळी होती. त्यांना सगळें पटत होतें; तरीही त्या स्वीकाराला नाखूष होत्या. आसक्ति तर फार, पण जग काय म्हणेल! त्यांची स्थिति नवख्या चोरासारखी झाली होती. वस्तूबद्दलची अभिलाषबुद्धि प्रखर झाली असतांही, तो कोणी पाहील कीं काय, या भीतीनें ती उचलायला भीत असतो; त्याचप्रमाणें यांच्या मनाची अवस्था झाली होती. नक्षत्रासारखी मुलगी, गुणही गोळा करण्यासारखे, आणखी किती तरी चांगल्या गोष्टी तिच्या ठिकाणीं त्यांना दिसल्या होत्या. पण कुळाला बट्टा लागतो म्हणून बिचकत होत्या त्या. ती त्यांच्या सद्धेतूची चूक होती. त्या अखेर म्हणाल्या, "पहा बाई! मला तरी काय समजतं आहे एवढं? अतिशय अडचणींत आहे हें फूल. स्वतःचा जीव संभाळून घेतां येत असलं, तर खुशाल घ्यावं; घेण्यासारखं मात्र आहे हं."

"घेण्यासारखं आहे म्हणून तर तें मिळवण्याची धडपड धरली आहे!" बाबासाहेब गंमतीनें म्हणाले, "आतां त्यामुळें त्रास होईल थोडासा; पण तो अपरिहार्य आहे! चालवाटेनं चालायचं, म्हणजे चढउतार आणि खांच-खळगे हे भेटायचेच! घेतां येईल तेवढा त्यांचा समाचार घेऊन पुढें निघावं, म्हणजे योग्य स्थळीं नक्की पोंचतां येतं. ध्येयाकडे जातांना हीं निरनिराळीं वातावरणं ओलांडायलाच पाहिजेत."

"हें झालं सगळं! पण मुळांत तिची तरी संमति आहे का या गोष्टीला? नाहीं तर उगोंच वाऱ्यावर काठीझोड करायचं होईल!" आनंदीबाई हंसत म्हणाल्या.

याच वेळीं स्वरूप आणि विमल या आंत आल्या. स्वरूप अजूनही औषधोपचार करीत होती त्यांना! कारण रुचीरनें तशी विनंतीच केली होती तिला. ती आंत येतांच बाबासाहेबांच्या प्रकृतीची विचारपूस करूं लागली.

"काय म्हणते आहे प्रकृति आतां!" तिनें विचारलें.

" फक्त पळतां येत नाहीं ! बाकी ठीक आहे ! " त्यांनीं उत्तर दिलें.

" इश्श ! " आनंदीबाई उद्गारल्या, " आयुष्याची बेरीज होते आहे; वजाबाकी नाहीं कांहीं ! आतां राहिलेलं एवढंस अंतर पळत पळत तोडण्याची इच्छा कशाला पाहिजे ? "

" हें आपलं कांहीं तरीच तुझं म्हणणं ! असं असतं तर पंगू माणसं लाखों वर्षे जगलीं असतीं ! आपण नाहीं या नसत्या आशेनं लंगडे राहायला तयार. " बाबासाहेबांनीं विनोद केला आणि ते स्वतःच खो खो करून हंसत सुटले. रम्य हास्य करीत स्वरूपनें स्वतःचें काम चालूच ठेवलें होतें पुढें. तें संपतांच ती जायला निघाली. तिला थांबवून ते म्हणाले, " बसा ना जरा वेळ. आमच्या विमलला कांहीं तरी विचारायचं आहे तुम्हांला ! "

अतिशय नम्रपणानें स्वरूप एका खुर्चीला धरून उभी राहिली. आतां काय विचारलं जाणार, याची अटकळ झालीच होती तिला. लज्जेनें थरकांप उडाला होता तिचा. कांहीं विचारलें तर, उत्तर देण्याची देखील ताकद नव्हती तिच्याजवळ. स्पर्शानें लाजणाऱ्या लाजाळूप्रमाणेंच तिच्या भावनाही विचारस्पर्शानें लाजून मुरून उभ्या राहिल्या होत्या. ती अवनत मुखानें पदराशीं खेळत राहिली होती.

" विमल, विचार ना यांना तुला काय विचारायचं आहे तें ! " बाबासाहेब पुढें म्हणाले.

" इश्श ! हें हो काय बाबा ? मीं कधीं म्हटलं मला कांहीं विचारायचं आहे यांना म्हणून ? उगीच अंगीं लावतां . वाटतं ? " विमल ओशाळून म्हणाली.

" काय पोरगी आहे पहा ! " बाबासाहेब हंसून म्हणाले, " अग तूंच म्हणाली होतीस ना कीं, या मला वहिनी आवडतात म्हणून. मग विचार त्यांना. त्या तुझ्या वहिनी व्हायला तयार आहेत का म्हणून ! "

विमल, आनंदीबाई, बाबासाहेब, सगळींच हंसलीं. स्वरूपही त्या प्रवाहांत उतरली होती हळूच ! हंसूं आटपून विमल म्हणाली, " हें विचारणं म्हणजे, कांदे कसे शेर, असं विचारण्यापैकींच समजतां वाटतं तुम्ही ! लाख माणसांपुढं व्याख्यान देणारी मुलगीही, आपली कबुली इतक्या धीटपणानं

देणार नाहीं. तुम्ही आतां त्यांच्याकडं पाहूनच काय समजायचं असेल तें समजा! खरं ना हो मी म्हणतें तें!"

तिनें शेवटीं स्वरूपलाच प्रश्न केला. स्वरूप काय बोलणार या गमतीपुढें! "इश्श!" एवढाच उद्‌गार अगर होकार देऊन म्हणा; तिनें तेथून द्रुत गतीनें पोबारा केला. विमलही हंसत हंसतच पाठीमागें पळत गेली.

बाबासाहेब आणि आनंदीबाई, त्यांना पाहिजे तें उत्तर मिळाल्याच्या समाधानांत बसून राहिले होते. इतर कसल्याही प्रकारच्या शंका कुशंका आणि वाटाघाटी, त्यांनीं मनांतून उचलून काढून एका बाजूला फेंकल्या होत्या. लवकरच त्यांनीं दिवाणजींच्या विचारानें पूर्वतयारी आरंभिली.

तिसऱ्या प्रहरीं रुचीर आणि स्वरूप यांची गांठ पडली. वडिल आणि मातुश्री, यांची अनपेक्षितपणें मिळालेली संमति, ही त्यांची आनंदाची पार्श्वभूमि होती. ते एकमेकांचा आनंद द्विगुणित करीत होते. रुचीर तर आनंदसमाधींत एकरूप होऊन गेला होता. पण स्वरूपचें तसें नव्हतें. सूक्ष्म छिद्रांतून गळून जाणाऱ्या हवेप्रमाणें, तिचा आनंदही कुठून तरी गळत होता. सर्व सुखाला मुकलेल्या शैलाची मूर्ति, तिच्या आनंदांत उतरली होती. शैला स्वतः आनंदी होती; पण त्याचमुळें स्वरूप विषण्ण होत होती. रुचीरही तिचा तो विषण्णपणा पाहून विस्मय पावत असे. तिची ती खिन्नता म्हणजे अति उसळयाच्या दमछाटीनें उमटलेली गंभीरता तर नव्हे? असाही तो स्वतःशीं प्रश्न करून पाहात असे.

त्यानें तिला उघडें मन करून विचारलेंच अखेर, "स्वरूप, तुझा आनंद जितका उघडा दिसतो आहे, तितकाच त्यांतला खिन्नपणाही दिसतो आहे. याचं कांहीं तरी विशेष कारण असलं पाहिजे. मला नाहीं का कळूं देण्यासारखं तें? मी तुझ्या आनंदाचा जसा भागीदार होऊं पाहात आहें, तसा तुझ्या या लपलेल्या विषण्णतेचाही व्हायला तयार आहें. एकमेकांनीं एकमेकांना आपलीं सुखंच वहावींत म्हटलं, तर तें नीरस जीवन होईल. प्रत्येक परिस्थितीचा सहभागी होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शक्य तर, एकमेकांच्या सूक्ष्म भावनाही, एकमेकांपासून चोरून न ठेवण्याचा प्रयत्न करायला पाहिजे. परस्परांच्याबद्दलचा आपलेपणा उजळ राहातो त्यामुळं."

"आपल्यांतील आपलेपणा नेहमींच उजळ राहील." स्वरूपनें गंभीरपणानें आश्वासन दिलें, "वेड्यावांकड्या शंकांनीं, हृदय गढूळ होऊं देऊं नका. माझ्या आनंदवैभवाला उन्माद होऊं नये म्हणून कायम खिन्नतेचं गालबोट लावलं आहे दैवानं! आपण ऐकलंत तर माझ्यासारखीच आपली अवस्था होईल. पण माझा नाइलाज आहे. मला माझ्या खिन्नतेचं कारण उघडून दाखवतां येत नाहीं! तें जोंपर्यंत मला माझ्या हृदयांत संभाळून ठेवतां येईल तोंपर्यंत ठेवीन. शक्तीपलीकडे गेल्यावर, परवानगी घेऊन उघडपणानें आपल्या स्वाधीन करीन."

"स्वरूप, मनमोकळेपणानं सांग, जी घटना घडून येते आहे, तीबद्दल तुला वाईट नाहीं ना वाटत? हा तुझ्या इच्छेवर जुलूम होतो आहे, असं तर नाहीं वाटत तुला? तसं असेल तर मला सांग. आपला संसार, म्हणजे अनंत यातनांचा अस्ताव्यस्त पसारा, असं होऊं नये म्हणून विचारतों आहें मी."

"काय तरी बाई बोलणं हें!" स्वरूप खिन्नतेला विसरून एकदम हास्य करीत म्हणाली, "संशय घेण्याच्या बाबतींत, पुरुषांचा बराच वरचा नंबर आहे म्हणून म्हणतात, तें कांहीं खोटं नाहीं!"

"चल! कांहीं तरीच बोलूं नकोस उगीच." तो स्मितपूर्वक म्हणाला.

"मी कांहीं तरीच बोलतें हं!" तिनें विचारलें, "आणि आपलं बोलणं मात्र ठीक होतं नाहीं? नाही तरी वांकडे विचार विणीत बसायची संवयच असते पुरुषांना! माझं राहूं द्या परतं; पण आपलं मात्र पाहा. माझी घोरपड गळ्यांत अडकवून घेतल्यानं, पुढं पश्चात्ताप विकीत बसायची पाळी यायची नाहीं तर!"

हा विनोद आणखीही वाढत गेला असता कदाचित्; पण तो तितक्यावरच थांबला. विमल, प्रगति, वसंत आणि कुमारी, हीं एकदम दाराशीं येऊन उभीं राहिलीं.

"परवानगी आहे का आंत येण्याची?" कुमारीनें विचारलें.

"अजून पाटी नाहीं लटकावली म्हटलं!" तिला ओढून आंत घेत

असतांना स्वरूप म्हणाली, "अ.न्‌ लटकावली तरी तूं काय दाद देणार आहेस थोडीच! 'औट' च्या ठिकाणीं 'इन्' करून, स्वतःच 'येस' म्हणून आंत शिरशील कीं!"

"असंही नाहीं करणार मी. पहातं आहे कोण ती पाटीन् फिटी. समोरच येऊन परवानगी मागेन म्हणजे झालं!" कुमारीनें उत्तर केलें.

"अहो म्हटलं, अशानं शिस्तीचा प्राण जाईल कीं." विमल म्हणाली. "असल्या बेशिस्तपणाबद्दल सुंठीचा लेप दिला जाईल कपाळावर."

"मरो ती शिस्त." प्रगति म्हणाली. "तिच्यासाठीं का आपण इथें आलों आहोंत?"

"मीसुद्धां तेंच सुचवणार होतों तुम्हांला" वसंत म्हणाला, "तुम्ही कशासाठीं आलांत तें सांगा ना. हा शिस्तीचा पानपाचोळा उचकटीत बसल्यानं, काय फायदा होणार आहे?"

"म्हणजे आम्ही कांहीं फायद्याच्या आशेनं आलों आहोंत वाटतं इथं?" प्रगति सहास्य त्याच्याकडे पाहात म्हणाली.

"मग काय तोटयासाठीं?" त्यानें म्हटलें.

"तोटाच तर काय!" कुमारीनें प्रत्युत्तर केलें. "पण तो आम्ही स्वखुषीनं पत्करणार आहोंत. बरं कां हो रुचीर, उद्यां गांवाबाहेरच्या आम्राईत तुम्हांला गडगनेर द्यायचं ठरवलं आहे आम्हीं. आधीं सूचना देण्या-साठीं आलों आहोंत; नाहीं तर घ्याल एकाद्या सभेचं आमंत्रण गळ्यांत!"

"कां, गांवांतला गडगनेर पचला नसता वाटतं आम्हांला?" रुचीरनें विचारलें.

"सुधारकाला गडगनेरही तसलाच द्यायला पाहिजे!" कुमारी उत्तरली. "पण पाहिजे आहे कशाला ही फांद्याफूट. तुम्ही आपले या म्हणजे झालं! तुलाही यायला पाहिजे हं ताई; नाहीं तर म्हणशील, मला कुठं कुणीं सांगितलं? एकाच कार्डावर दोघांना आमंत्रण लिहिलं आहे असं समज."

कुमारीचा तो हंसरा मनमोकळेपणा पाहून स्वरूप स्वतःशींच ओशाळली होती. ती मनांतल्या मनांत म्हणाली, "खरंच का शैला सगळ्या गोष्टी विसरून गेली? विसरण्याइतकी सोपी आहे का गोष्ट ही? केवढं कठिण

दिव्य आहे हें ! तिच्या भावनांचा विकास ।.तो न होतो तोंच, त्यांच्याव
निराशेची वीज कोसळून त्या होरपळून निघाल्या ! तिच्या प्रेमाची हिरव
करपून निघाली. तिच्या आशा मलूल मुखानं इतस्ततः विखरून उधळल
गेल्या ! तरीही शैला हंसू शकते ! आणि मी ! . . . . ! ”

एक लांबच लांब उदास निःश्वास तेवढा टाकतां आला तिला.

सुखदुःखांच्या संमिश्र शृंगारांनींच मानवी जीवनाची सुरुवात अस
म्हणायची; दुसरें काय ?

---

# अखेर

एका शुभ मुहूर्तावर स्वरूप आणि रुचीर यांचा विवाह उरकण्य
आला. या विवाहाला प्रागतिक मताचे पुष्कळच लोक हजर हो
कांहीं वर्तमानपत्रांतून त्यांचें उघड उघड अभिनंदन करण्यांत आलें हो
विरोधी सूरही उमटल्यावांचून राहिले नाहींत. पण तिकडे मुद्दामच दुर्ल
करण्यांत आलें.

उत्कृष्ट रीतीनें समारंभ साजरा करण्यांत आला.

* * * *

समारंभ संपतांच प्रगति आणि वसंत पुण्याला निघून गेलीं. सलगीच
सहकार्यानें त्यांनीं आपलें आयुष्य पुढें सुरू केलें होतें. यापुढें ते काय करता
याची वाट पाहणेंच योग्य होणार आहे.

* * * *

कांहीं तरी विशेष लाभल्याच्या समाधानानं बाबासाहेब तल्लीन आहे
अर्थात त्यांचा सगळा परिवारच त्या समाधानाच्या भागींत आहे.

* * * *